ॉंटिनेन्टल प्रकाशन.......५२ वें

ज्यांची बेरीज एक रुपया होत नाहीं असे

# सोळा आणे

लेखक

चिंतामण विनायक जोशी




किंमत : अवघी चाळीस आणे

प्रथमावृत्ति—सन १९४७

प्रकाशक

अ. अं. कुलकर्णी
कॉटिनेंटल् प्रकाशन
१९६/१९ सदाशिव,
पुणें २.





चित्र
डी. डी. दलाल,
दलाल आर्ट स्टुडिओ,
खटाववाडी मुंबई नं. ४, यांचें आहे.



मुद्रक
स. रा. सरदेसाई,
समर्थ भारत छापखाना,
४१ बुधवार पेठ,
पुणें २

## वटाव

ह्या संग्रहांतील गोष्टी बहुतेक वेगळाल्या सामयिकांच्या दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. नवजीवन, विविधवृत्त, वसंत, हंस, नवयुग, समीक्षक, नवा झंकार, महाद्वार, दीपावली ह्यांच्या संपादकांचे पुनर्मुद्रणास परवानगी दिल्याबद्दल आभार मानणें अवश्य आहे.

ह्या गोष्टींपैकीं 'पेटींतील गौप्य' ही मीं विद्यार्थिदशेंत असतांना लिहिलेली आणि प्रेमोद्यान नांवाच्या मासिकांत प्रसिद्ध झालेली होती. ही एका इंग्रजी गोष्टीवरून रूपांतर केलेली आहे. मूळ लेखकाचें नांव आतां आठवत नाहीं. चालीरीती किंवा स्थानिक परिस्थिति यांचे खून पडलेले दिसतील ही गोष्ट वाचतांना; परंतु मूळ गोष्टीच्या रसाळपणाची आणि उद्बोधकत्वाची कल्पना ह्या नवशिक्या अनुकरणावरून वाचकांस आल्याशिवाय रहाणार नाहीं. ही गोष्ट चिकित्सापूर्वक न वाचतां रहस्यो-द्ग्राहीपणें वाचावी अशी वाचकांस विनंती आहे.

'निष्फळ क्लेश', 'खडीसाखरेचा खडा,' 'मिळवत्या बायकोचा नवरा' आणि 'सारंगीवाला' ह्या कथांतील घटना प्रत्यक्ष अनुभवाचीं फळें आहेत. मायेनें आणि प्रेमानें सोसलेले कष्ट कित्येकदां सफळ होतात तर कित्येक वेळां फळ येण्याच्या उमेदींत ते फुकट जातात. सृष्टिक्रम अत्यंत निर्घृण आहे, सत्कर्माला किंवा पराक्रमाला यश मिळालें म्हणजे त्याचेच आपण गोडवे गातों आणि यशस्वी कृत्याचीच आठवण समाजास राहते; परंतु व्यर्थ गेलेल्या खटपटींची किंवा क्लेशांचीच संख्या जगांत अधिक मोठी आहे. असें जाणूनहि प्रेमी किंवा मायाळू माणसें दुसऱ्या जीवाकरितां स्वतःचा जीव तोडून देण्यास तयार होतात. कलम केलेली माया आंतड्याच्या पिळाची बरोबरी करूं शकत नाहीं; मोठीं माणसें स्वार्थाकरितां वरपांगीं ममतेचें ढोंग करीत असलीं तरी लहान मुलांच्या

निर्मल अंतःकरणास त्या स्वार्थाचा संपर्क होत नाही; प्रलोभनाच्या जोरावर पर,या जीवाचें मन आपण आपल्याकडे ओढून घेऊं अशी भावना ग्र,शी बाळगण्यांत कांही अर्थ नाही; आपलें तें आपलें आणि परकें ते ",कें; आपलें जर नसलें किंवा असून नाहीसें झालें असलें तर परक्याला कवटाळून आपलेसें करून घेण्याच्या फंदांत माणसानें पडूं नये. हीं सत्यें चितारण्याचा यत्न पहिल्या दोन गोष्टींत केला आहे.

हल्लीं पुष्कळ बायका मिळवत्या झालेल्या आहेत. त्यांपैकीं कित्येक जणींचे नवरे त्यांच्यापेक्षां अधिक कमाई करणारे असल्या.ने त्यांना आपल्या नवरेपणाची लाज बाळगण्याचें कांहीच कारण नसतें; परंतु कित्येक नवऱ्यांची कमाई बायकोच्याच कमाईपेक्षां कमी असते तर आणखी कांहीं सर्वस्वी बायकोच्या कमाईवरच जगत असतात. अशा जोडप्यांपैकी एकानें मिळवावें आणि दुसऱ्यानें त्याची विल्हेवाट लावावी हा क्रम सगळ्याच सजीव सृष्टींत दिसून येतो; तथापि पुरुषानें शिकार आणावी आणि स्त्री व संतति यांची उपजीविका करावी असा क्रम आजपर्यंत चालत आलेला असल्यानें पुरुषाला स्त्रीच्या जिवावर जगणें हा सामाजिक मानहानीचा प्रकार वाटतो. मन अशा पुरुषाला सांगतें, "बाबा रे, ही तुझी मानखंडना आहे!" तर आंतला आवाज सांगतो, "हँ, जाना देव! असल्या जुनाट भावनेच्या भरी पडून स्वतःची आणि कुटुंबाची चंगळ कमी होऊं देऊं नको!" आपल्याहून अधिक मान्यता झळकविणाऱ्या पत्नीविषयीं असूया, मत्सर आणि आदर त्या तिन्ही भावना त्याच्या हृदयांत कसा धुडगूस घालीत असतात तें 'मिळवत्या बायकोचा नवरा' या समाजचित्रांत दाखविलें आहे.

सध्यां वाङ्मयिकांना गरिबांचा फार पुळका आलेला आहे. गरीब हा अत्यंत सोशिक, प्रामाणिक, कष्टाळू आणि नीतिमान् प्राणी असून तो धनिकरूपी राक्षसाच्या पायदळीं तुडविला जात आहे आणि

पांढरपेशा वर्गाचें साह्य ह्या कामीं धनिक वर्गाला मिळत आहे अशी रशियन कल्पना पसरविण्याचें काम आमचे आंधळे वाङ्मयिक करीत आहेत. सारंगीवाला ह्या गोष्टीत गरीब समजल्या जाणाऱ्या वर्गाच्या एका घटकाची लुच्चेगिरी आणि पांढरपेशांचा भोळेपणा यांचें दृश्य वाचकांपुढें धरलें आहे. अशा प्रकारचे अनुभव मध्यम वर्गाच्या लोकांस नेहमीच येत असतात आणि झाडाच्या फांदीवर शेंड्याकडील बाजूस बसून फांदी तोडूं पाहणाऱ्या मूर्ख कुऱ्हाडवाल्याप्रमाणें आमचे मध्यमवर्गीय लेखक स्वतःवरच टीकेचे प्रहार करून घेत असतात.

'बाप्यांला नाही तें समजायचं' ह्या गोष्टींत स्त्रियांच्या एका स्वभावविशेषाचें रेखाटन केलें आहे. स्त्रियाना पति इतका प्रिय आणि पूज्य वाटत असतो की त्यानें जर आपल्याशी विद्रोह केला तर त्याचा राग न धरतां विद्रोहकारण झालेल्या सपत्नीचाच त्या द्वेष करतात किंवा तिची भीति मनांत बाळगतात. अंगांत येणें, भूतबाधा होणें, अंगावरील वस्त्रें किंवा भूषणें नाहीशी होणें किंवा देहास आपोआप इजा होणें असल्या प्रकारांचें कारण ही भीति आणि तिच्यायोगें झाडानें स्वतः-वरच प्रयोग करून घेणें हेच असतें अशी मी सूक्ष्म निरीक्षणानें स्वतःची खात्री करून घेतली आहे. बायकांच्या ह्या विपरीत स्वभावाप्रमाणें पुरुषांच्या ठिकाणींहि निराळ्या तऱ्हेचा विपरीतपणा आढळून येतो तो 'बायकांचा विपरीत स्वभाव' ह्या गोष्टींत सांगितला आहे.

मी एखाद्या खेडेगांवीं कामाला गेलों आणि तेथें तिन्हीसांजची वेळ घालविण्याचा प्रसंग आला तर नदीकांठ, टेकाड, तलावाची पाळ किंवा एखादें शून्यागार हुडकून एखादें पुस्तक बगलेंत मारून तेथें वाचीत बसावें ह्या उद्देशानें फिरावयास जातों. अशा प्रसंगीं मला स्वतःच्या कोलंबसपणाचा अभिमान पुष्कळदां झाडून टाकावा लागतो. कारण वाचीत बसण्यासाठीं जी रमणीय जागा मीं शोधून ठेविलेली होती ती

एखाद्या गांवकऱ्याला दुसऱ्या एका कार्याकारितां तितकीच रमणीय आणि स्फूर्तिदायक वाटली होती असा अनुभव येतो. आपल्या शोधक बुद्धीचें स्मारक तो (किंवा ती) ठेवून गेलेला (किंवा गेलेली)च असतो (किंवा असतो). चांगल्या ठिकाणी घाण करून ठेवण्याची आमच्या ग्रामजनांची संवय कशी घालवावी ह्या प्रश्नाचें चिंतन करीत असतां 'आरोग्यमातेचें मंदिर' ह्या कथेचा उगम माझ्या मनांत झाला. ही कथा आरोग्याचें प्रचारकार्य करणारांना उपयुक्त वाटेल अशी आशा आहे.

दुसऱ्या महायुद्धानें युरोपचा पादार्थिक विध्वंस केला आणि त्या दृष्टीनें हिंदुस्थान शाबूत राहिलें हें खरें असलें तरी हिंदुस्थानचा नैतिक विध्वंस मात्र ह्या युद्धानें निःशेषपणें केला आहे. राज्ययंत्र आणि व्यापार दोघांनाहि माणसांच्या रक्ताची चट लागली आहे. उदरनिर्वाहाचे परंपरागत आणि अनुभवसिद्ध शहाणे मार्ग गैरकायदा ठरल्यानें राजा आणि प्रजा एकमेकांना ठकविण्याचा कसा यत्न करीत आहेत तें 'टोळ आणि मुंगी' ह्या गोष्टींत वर्णिलें आहे. तपासणी-अंमलदार नष्ट झाले म्हणून भ्रष्टताविरोधक अधिकारी नेमण्यांत आले. जनतेवरील कराचें दडपण दुप्पट झालें. आता भ्रष्टताविरोधक विरोधी खातें निर्माण होऊन करांचें ओझें तिप्पट होणार असें दिसते. उद्योगी मुंग्यांचे अन्नाचे सांठे गणवेषधारी टोळ लुबाडून नेतच आहेत आणि मुंग्यांच्या कंठांशीं प्राण आले असले तरी टोळ दसपट फुगले आहेत. द्वितीय महायुद्धानें व्यापाऱ्यांना पुष्ट केलें, व्यापारांच्या नाड्या ज्यांच्या हातांत आहेत अशा अधिकाऱ्यांना श्रीमंत केलें, मजुरांना बेफिकीर आणि माजोरी केलें, तर निमूटपणें खालचे-वरचे प्रहार सहन करणाऱ्या मध्यमवर्गीयांचीं मात्र हाडें खिळखिळीं करून सोडिलीं.

'लेखक आणि संपादक' हा चुटका लेखकवर्गाच्या नेहमींच्या अनुभवाचा द्योतक आहे. कालिंदीचीं कहाणी' हें कित्येक औषधांच्या जाहि-

रातींचें विडंबन आहे. जाहिरातबाजीस भुलून तोंडाळ जाहिरातदारांच्या कचाट्यांत सांपडण्याची संवय लागलेलें एखादें तरी सावज ह्या इषाऱ्यानें सावध होऊन वित्तापव्यय थांबवील तर ही कहाणी सांगण्याचें सार्थक होईल. 'नबाबसाहेबांची कविता', 'दिवाणसाहेबांचें घड्याळ' आणि 'शेठजींचे दुसरें लग्न' ह्या तिन्ही गोष्टी—चुटके म्हणा हवे तर मोठ्या लोकांच्या मनाचा किंवा बुद्धीचा छोटेपणा उघड करून दाखवितात. हे चुटके लिहिण्यांत मनोविनोदापेक्षां वेगळा हेतु नाहीं. 'गणोबास हाती द्यावा' ही ऐतिहासिकपणाचें पांघरूण घातलेली कथा ज्यांना ऐतिहासिक पत्रें, बखरी वगैरे वाचण्याचा नाद आहे अशा लोकांचें क्षणभर मनोरंजन करील. मोडी लिपी हलके हलके काळाच्या ओघांत गडप होत चालली आहे ; पण ज्यांना ती वाचण्याचा थोडा तरी नाद आहे अशा वाचकांना तिचें स्वारस्य कळेल.

'गैरसमज' ही युद्धोत्तरकालीन कथा एका इंग्रजी कथेचें रूपान्तर आहे. ह्या मूळ कथालेखकाच्या नांवाचा किंवा प्रकाशनस्थळाचा निर्देश स्पष्ट सांगणें कांहीं कायदेशीर निर्बंधांच्या अडचणीमुळें शक्य नाहीं. अर्थात् त्यांचें ऋण कबूल करणें शिष्टसंमत म्हणून भाग आहे.

हल्लीं गोष्टींचे संग्रह भाराभर निघत असून माझ्या तंत्रहीन अडगळीची त्यांत भर कशाला ? असा प्रश्न चिकित्सक अभ्यासक करतीलच. त्यांना उत्तर इतकेंच कीं 'कॉंटिनेंटल'चे प्रकाशक रा. कुळकर्णी यांच्या आग्रहामुळेंच ही गोष्टींची जुडी बांधून वाचकवर्गापुढें सादर करण्यास मी सिद्ध झालों. ज्या अर्थी प्रकाशकांनीं आग्रह केला त्या अर्थीं ह्या गोष्टींस अडगळ न मानणारे कांहीं वाचक असतीलच आणि त्यांच्याकरितांच हें ताट वाढून आणिलें आहे. 'यद्रोचते तद् ग्राह्यम् यन्नरोचते तत्त्याज्यम् ।'

बडोदें,
महाशिवरात्र, शके १८६८ } चिंतामण विनायक जोशी.

## अनुक्रमें



सोळा आणे

## बाप्यानूला नाहीं तें समजायचं ! : : १

मी कॉलेजांत विद्यार्थी होतों तेव्हां सायकलवरून चकरा मारण्याचा मला बराच नाद होता. एकदां पाटणहून चिपळूणला जात असतां विश्रांति घेण्याकरितां रस्त्यावरील एका पुलाच्या काठाशीं गाडी उभी करून कांठावर बसलों. समोरच एक लहानसा बंगला दिसत होता. त्याचें दार उघडें दिसत होतें आणि कौलें अस्ताव्यस्त झालेलीं होतीं. हा बंगला कोणाचा असावा असा विचार मनात घोळूं लागला. इतक्यांत, 'तात्या, वाइच उतरूं लागता का ?' असे बाईमाणसाचे शब्द कानीं पडले.

डोक्यावर मोळी घेतलेल्या जरा उतार वयाच्या बाईचे ते शब्द होते. तिच्या मोळीला हात लावून पुलाच्या कांठावर मोळी ठेविली. बाई रस्त्यांत बसून बटवा काढून तंबाकू चोळूं लागली. आपली शंका तिला विचारावी असें वाटून मीं तिला म्हटलें,

" मामी, हा कोणाचा बंगला आहे ?"

" हा बंगला तुम्हांला माहीत नाही ! फारिष्टराचा बंगला आहे हा. "

" मग ह्यांत कोणी रहात नाहीं का ?

" अग ऽ बया ! ह्यांत कोण रहाणार ? कोणाचा जीव वर आला आहे ह्यांत रहायला ?"

" कां बरं ? भुताटकी आहे वाटतं ह्यांत ?"

" असंच कांही तरी आहे, तात्या. लांकडाच्या भाऱ्या विकायला लागायच्या आधी मी पण नव्हत्यें का तिथंच कामावर. पण जाऊं द्या, लई लांब आहे ती गोष्ट. इतका टाईम नाही मला. भारी विकून तांदुळ अन् म्हावरं घेऊन शिरगांवला पोंचलं पाहिजे मला दिवस मावळायच्या आंत. "

मला ती गोष्ट ऐकण्याची इतकी उत्सुकता वाटत होती की मीं खिशांतून एक अधेली बाहेर काढली आणि ती तिच्या भारीची किमत म्हणून देऊं करून गोष्ट सांगण्याची तिला विनंति केली अधेली कडोसरीला लावून तिनें त्या बंगल्याची गोष्ट सांगण्यास प्रारंभ केला. तिची कोकणी कुणबाऊ भाषा जरा सुधारून घेऊन ती गोष्ट तिच्या शब्दांत देत आहें.

"आनंदराव नांवाचा फारेष्ट हापीसर ह्या बंगल्यांत रहात होता. तो रहायला आला तेव्हां त्याच वय फार तर पंचवीस वर्षांचं असेल. अंगानं उंच, सडपातळ पण चांगला मजबूत मनुष्य होता तो. गोरा पण होता ब्राह्मणासारखा. घोड्यावर बसून जेव्हां का फिरायला निघे तेव्हां फारच उमदा दिसत असे, दृष्ट काढून टाकण्यासारखा. त्याच्या हाताखालचा शिपाई गोविंदा त्याचा स्वयंपाक करीत असे, अन् मी दोन वखतां जाऊन भांडी घाशित असें.

एक वर्ष झालं तेव्हां तो महिन्याच्या रजेवर जायला निघाला. मला म्हणाला, 'गिरजा, आतां मी महिनाभर कोल्हापूरला जातों आहें. पण येतांना तुझ्यासाठीं धनीण घेऊन येणार आहें. दुप्पट भांडीं अन् दुप्पट धुणीं पडतील तुला धुवायला. पगार पण दुप्पट देईन.'

मी हांसून म्हणाल्यें, ‘ एक वरसान दुपटीची तिप्पट .होईल, धनीसाहेब. मलाबी पगार वाढॅल अन् तुमचं बी घर वाढॅल.’ एक महिन्यानं माझी धनीण आनंदरावाबरोबर मोटारीतनं आली. घरांत शिरायच्या आधी मी दोघांच्या वरून दहीभात अन् लिंबू ओवाळून टाकलं. घागरभर पाणी त्यांच्या पायांवर ओतलं. आनंदरावानं हांसत हांसत खिशांतून दोन रुपये काढून माझ्या हातावर टाकले. धनीण म्हणाली, ‘बरीच हुशार दिसते आहे आपली कामकरीण ! ट्रंक उघडली की लुगडं काढून देईन तिला एक.’ दोघंजणं बंगल्यांत गेलीं. गोविंदानं चहा करून दिला. मी कपबशा विसळल्या. चहा पितांना दोघंजणं शेजारी चिकटून बसून चहा प्याले. मी नव्हते कधीं नवराबायको असे जवळ बसून बघितले चहा पितांना ! पिरेम का काय म्हणतात ना तें लई होतं दोघांच.

अन् माझी धनीण होती बी तशीच गुणाची. अशी सुरेख अन् पिवळीधमक होती, जशी कांही शेवंतीची कळीच ! आवाज तर इतका गोड कीं जसा खडीसाखरेचा खडा. मला म्हणायची ‘गिरजा, भांडीं घांसून थकून गेली असशील. हा घे गरमागरम कपभर चहा.’ एकदा मला मावळणीकडे लग्नाला जायचं होतं तर मला म्हणाली, ‘गिरजा, हें फाटक लुगडं नेसून काय चाललीस सोयऱ्याधायऱ्यांकडे ? तें माझं दांडीवरचं ओढून घे अन् नेसून जा.’ अशी होती फार ममताळु अन् गोड पोरगी ! मलाच तिनं इतका चटका लावला तर घोवाच्या जिवाला किती लागला असेल !

दोघंजणं एकसारखीं गुलगुल गोष्टी करायचीं. सकाळच्या प्रहरीं काळीं बुलबुल पांखरं जशीं न थांबतां एकसारखीं गुलगुल करीत फिरत असतात तशीं तीं दोघं करीत असत. तिच्यामुळं आनंदरावाचं फिरणं

कमी व्हायला लागलं. एकदां त्याच्या डोक्यावरचा साहेब त्याला म्हणाला,

'मिष्टर आनंदराव, लग्न झाल्यापासून तुझं टुरीन कमी व्हायला लागलं आहे. नोकरीचा राजीनामा दे, नाहीतर बायकोला तरी सोड-चिठ्ठी दे.' आनंदराव म्हणाला, 'मी दोन्हींपैकी कांहीच करणार नाही. पण टुरीन भरपूर करीत जाईन.' मग त्यानं आणखी एक घोडा विकत आणला अन् म्हणाला, 'मंजुळा, साहेबानं मला भरपूर टुरीन करायला सांगितलं आहे, अन् तुला एकलीला बंगल्यावर ठेवून मला बाहेर फिरवत नाहीं.'

'एकली कशानं ? ही गिरजा सोबतीला असतेच. शिवाय एकाद-दुसरा शिपाई अन् रखवालदार तर रात्रभर जागेच असतात बंगल्या-जवळ.' माझी धनीण म्हणाली,

'बरं तूं एकटी नसशील, पण मी नसतो का एकटा फिरतीवर गेलेलों ?' आनंदराव म्हणाला.

'आपल्याबरोबर जसे कांही हाताखालचे सर्कल इनिस्पेक्टर, कारकून वगैरे नसतीलच !'

'तसे रानांतले कुत्रे, स्वारीचा घोडा, इनिस्पेक्शान बंगल्यांतले उंदीरहि असतात, मंजुळा. पण तुझ्याशिवाय मी एकटा अन् माझ्या-शिवाय तूं एकटी असं मी समजतों,' आनंदराव रागानं म्हणाला.

'पण त्याला उपाय काय ! नोकरी असेल तशी केली पाहिजे !'

'ह्याला उपाय म्हणजे तूं माझ्याबरोबर टुरीनला येत जा. हा पहा अगदीं गरीब घोडा आणला आहे तुझ्याकरतां. तुला कधीहि पाडणार नाहीं किंवा चावणार नाहीं अन् लाथहि मारणार नाहीं. शेळीसारखा गरीब आहे.' नवीन आणलेल्या घोड्याच्या पाठीवर थाप मारीत आनंदराव म्हणाला. मंजुळेनं 'जरी

इश्श केलं तरी ती घोड्यावर बसून नवऱ्याबरोबर जायला तयार झाली. थोड्याच दिवसांत त्यानं तिला रायडिंग ड्रेस आणला. कोल्हापूरच्या आक्कासाहेब हाच ड्रेस घालतात असं त्यानं सांगितलं. खाकी रंगाचा शिकारी कोट, खाकी गुडघ्याखाली घट्ट विजार, लांब बूट अन् जड साहेबाची टोपी, असा ड्रेस होता. मंजुळेच्या अंगावर गुलाबी पातळ जितकं शोभत असे तितकाच तो शिकारी ड्रेसहि तिला खुलून दिसत असे.

त्या दोघांचं प्रेम अगदी गाण्यांतल्या राधाकृष्णांच्या प्रेमासारखंच दाट अन् जड होतं. एकमेकांवाचून एक क्षणभर त्याना चैन पडत नसे. पण देवानं त्यांचे चांगले दिवस फारसे चालूं दिले नाहीत. मंजुळा हिवतापानं आजारी पडली. आनंदराव म्हणाला, ' मंजुळा, तूं औषध घेण्याकरितां कोल्हापूरला माहेरीं रहा. तुला माझ्याबरोबर फिरायला नेणं बरोबर नाही. इथें शिरगांवांत डॉक्टर नाही अन् वैद्यहि नाही. ' मंजुळा म्हणाली, 'तुम्ही रजा काढून माझ्याबरोबर येत असाल तर मी माहेरीं जाईन. नाहीतर इथेंच राहीन. औषध काय ? टपालानं बाटल्या मागवून घेऊं म्हणजे झालं.'

आनंदारावाला रजा मिळाली नाहीं. मंजुळेचं दुखणं थांबेना. एक दिवस चिपळुणाहून डॉक्टर आणला. त्यानं तपासून सांगितलं, 'ह्यांना क्षयाची भावना दिसते आहे. हीवताप फार दिवस अंगावर काढल्यामुळं प्रकृति विकोपाला गेलेली आहे. '

मंजुळा शिरगांव सोडून दुसरीकडे रहायला कबूल होईना. म्हणून इथें ह्या बंगल्यांतच तिच्या दवापाण्याची तरतूद केली. एक नर्स नोकरीला ठेवली अन् चिपळुणाहून एक दिवसाआड इंजक्शन द्यायला डॉक्टर यायचा. मलाबी तिचं सगळं काम करावं लागलं म्हणून दहा रुपये पगार मिळूं लागला. एकदां माणसाला खय लागला म्हणजे

त्यांतून तें बरं झालेलं कोणी ऐकलं आहे काय ? पिवळ्या सोनचाफ्यासारख्या मंजुळेचा रंग फिकट होऊन ती आतां पांढऱ्या चाफ्याच्या फुलासारखी दिसूं लागली होती. तिचे चमकणारे डोळे विहिरीच्या पाण्यावर पडलेल्या चंद्राच्या पडछायेगत खोल दिसुं लागले. तिचं गुटगुटीत अंग सुकलेल्या दोडक्यावाणी रखरखीत दिसूं लागलं. आनंदराव तिला धीर द्यायला हांसत हांसत तिच्याशी बोले. पण बोलणं संपतांच दुसऱ्या खोलींत जाऊन हातांनीं डोळे झांकून ओक्साबोक्शी रडून घेत असे.

एका रात्रीं पायगती मी पडल्ये होतें. अष्टमीची रात्र होती ती. अर्धा चंद्र खिडकीतून फिका फिका दिसत होता. रातकिडे किरकिर करीत होते. खोलीतला दिवा मिणमिण जळत होता. मला झोंप लागली आहे असं समजून तीं दोघं बोलत होती. 'ऐकलं का, हा अष्टमीचा चंद्र मी शेवटल्यांदा पहात्यें आहें. पुनः तो मला दिसणार नाही.' मंजुळा खोल आवाजांत म्हणाली.

'हात् वेडे, आणखी निदान् पांचशें वेळां तरी अष्टमीचा चंद्र पहाशील. आजच डॉक्टरनी मला सांगितलं की, तुझ्या प्रकृतीत निच्छित सुधारणा आहे.' आनंदराव तिला धीर देत म्हणाला. पण त्याचं मन त्यालाच खात होतं हें खोटं उत्तर देतांना.

'मी फसायची नाही तुमच्या कुत्रिम बोलण्यानं. तुमचेच ओठ कांपत आहेत अन् डोळे पाण्यान भरले आहेत. पण गडे, मला एक वचन द्या म्हणजे मी सुखानं मरेन.' मंजुळा म्हणाली.

आनंदराव म्हणाला, 'मंजुळे, तूं मरावंस असं मला बिलकुल वाटत नाहीं, पण सांग तुझी काय इच्छा आहे ती. तुझी हौस आजपर्यंत कधीं तरी मी मोडली आहे का ?'

जरा वेळ थांबून अन् कंठाशीं आलेला गहिंवर ओसरून गेल्यावर

मंजुळा म्हणाली, ' मी मेल्यानंतर पुनः लग्न तर तुम्ही करणार नाही ना ? '

आनंदराव दचकून म्हणाला, 'मंजु, मंजुळे, हें काय तू विचारीत आहेस ? आधीं सांगायचं म्हणजे तूं मरत नाहीस. पण ती कल्पना तुला आवडत असली तरी दुसरं लग्न करण्याची कल्पना कालत्रयीं माझ्या अंतःकरणांत यायची नाहीं. हीच का ग तूं माझ्या प्रेमाची परीक्षा केलीस ? '

हातांत उरलेली दुबळी शक्ति एकवटून मंजुळेनं त्याचे हात घट्ट धरले अन् ती म्हणाली, ' किती झालं तरी बायकांचं प्रेम वेगळं अन् पुरुषांचं वेगळं. पण मला खरंच असं वाटतं की, पुरुषांनी बायकांच्या-सारखं एकनिष्ठ रहावं. कदाचित् मी वेडी असेन हा विचार मनांत यायला—'

वेडी कशानं ? पुरुषांना एकनिष्ठ रहातां येत नाहीं काय ? अन् तसा विश्वासघातकी विचार माझ्या मनांत आला तर पिस्तुलानं ह्या कुचक्या मेंदूचे तुकडे उडवल्याशिवाय मी राहीन का ? ' आनंदराव त्वेषानं म्हणाला.

' तर मग वाहा पाहूं शपथ कीं मी दुसरी बायको कध्धी करणार नाहीं म्हणून ! ' मंजुळा म्हणाली.

' कोणाची शपथ घेऊं ? पाहिजे तर ह्या अस्ताला जाणाऱ्या अष्ट-मीच्या चंद्राची शपथ घेऊन मी सांगतों की तुझ्यानंतर मला सगळ्या बायका आयाबहिणींवाणी आहेत. वाटलं तर ह्या किरकिरणाऱ्या रात-किड्याला साक्ष ठेवतों—' आनंदराव म्हणाला.

मंजुळेच्या गळ्यांत सोन्याच्या माळेंत गुंफलेलं मंगळसूत्र होतं. उजव्या हातानं तें उंच करून अन् डाव्या हातांत आनंदरावाचा हात धरून अन् त्याला मंगळसूत्र लावून ती म्हणाली, 'ह्या मंगळसूत्राची

शपथ घेऊन सांगा कीं मी दुसरी बायको करणार नाही म्हणून.' आनंदरावानं तशी शपथ घेतली, तेव्हां तिचें समाधान झालें. मलाबी तितक्यांत झोप लागली अन् त्यांचं पुढलं बोलणं मला ऐकूं आल नाहीं. पुनवेच्या पहांटे मंजुळा हा मृत्युलोक सोडून गेली. आनंदरावांना मस्त वाईट वाटलें. दोन दिवस पोटांत अन्नहि घेतले नाही. मग मित्रमंडळींनी अन् मींबी आग्रह करून दोन घांस खायला लावले. बायकोच्या आठवणीनें तो सुकून जाऊं लागला. 'आतां नोकरी सोडून देऊन कुठेंतरी वनवासांत निघून जावं' असें तो म्हणायला लागला. तशी मी म्हणाल्यें, 'धनीसाहेब, तुम्ही फारेष्टर, तुमचा जन्म वनवासांतच जातो आहे. वायला वनवास कशापायी हवा ? मी आपली नोकरमाणूस, पण च्यार पावसाळे जास्त काढले आहेत—'

'गिरजा, तूं नोकरमाणूस असलीस तरी मला वडील बहिणीवाणी आहेस. सांग, आतां हें दुःख मी सहन कसं करूं तें !' आनंदराव कळवळून बोलला.

मीं सांगितलं, 'धनी, खबुतरांचं लई प्रेम असत एकमेकांवर, पण मादी मेली तर नर दुसरी जोडीदार केल्याबिगर रहात नाही. एखाद्याचं घर पुरांत वाहून गेलं तर तो उरलेले दिवस उन्हापावसांत उभा राहून का घालवितो ? पुनः नाही का घर बांधीत दुसर ? तसंच बाबा तुमच्या संसाराचं झाड कोलमडून पडलं तर दुसरं नको का लावायला !'

आनंदरावानं माझं बोलणं झिडकारल नाही. 'गिरजेच्या बोलण्याचा विचार केला पाहिजे' असं तो म्हणाला. हळूहळू त्याचं दुःख कमी व्हायला लागलं, पण एकसारखा विचार करीत बसायचा. एक दिवस मला म्हणाला, 'गिरजा, मीं दोन महिन्यांची रजा घेतली आहे. चक्कर मारून येतो कोल्हापुरापासून मुंबईपर्यंत. ओळखीच्या लोकांना भेटलों

म्हणजे तेवढाच दुःखाचा विसर पडेल. तूं घरावर देखरेख ठेव. दुसऱ्या दिवशी मोटारीनें तो रजेवर गेला.

दोन महिन्यांनी आनंदराव परत आला तो दुसऱ्या बायकोला घेऊनच आला. पहिली बायको सोनचांफ्यावाणी पिवळी धमक अन् जाडगेली होती, तर ही जुईच्या फुलावाणी गोरीपान अन् शेवग्याच्या शेंगेगत बारीक नि उंच होती. तिचे डोळे एखाद्या देवीच्या डोळ्यावाणी पुण्यवान् दिसत होते. लग्न होऊन स्वतःच्या घरी जरी ती आली होती तरी एखाद्या दुःखीकष्टी माउलीसारखी पोक्त दिसत होती ती. ह्या वखताला मी लिंबलोण केलं नाही. कोणतीबी गोष्ट एकदांच करण्यांत गम्मत असती. मला पाहून आनंदराव म्हणाला, 'सगुणा, ही आपली जुनी कामकरीण, पण हिला मी वडील बहिणीसारखी समजतों.' त्या-सरशी 'वन्सं, नमस्कार करत्ये,' असं म्हणून ती माझ्या पायां पडायला लागली. तेव्हां मी तिला अडबून म्हटलं, 'नको नको, बाईसाहेब, धन्यान गंमतीनं थोरपणा दिला तरी मी आपली पायरी ओळखून आहें. मी तुमची सेवा मंजुळाबाईवाणी मनापासून करीन; या घरांत अन् ही ओसाड पडलेली बाग पुनः फुलवा.'

आनंदरावाचं मंजुळेवर जसं प्रेम होतं तसंच सगुणेवरबी जडलं. सगुणा आपल्या सवतीसारखी बोलकी, खेळकर अन् अल्लड नव्हती. पोक्त अन् विचारवंत होती. तरी तिच्या मोजक्या बोलांतून करंगळी-एवढी प्रेमाची धार लागत असे. तिची नजर इतकी गोड होती कीं, माझ्यासारख्या बाईमाणसालादिखित मोहो पडत असे, मग तिच्या नवऱ्याची काय गत होत असेल! कांही न बोलतां ती दोघं एकमेकां-कडे बघत वेळ घालवीत असत. वेगळ्या पंखीचं हे प्रेम होतं.

तरी आनंदराव मंजुळेला विसरला नाहीं. त्यानं मंजुळेची एक सुरेख रंगीत तस्बीर करवून आणली. अगदी हुबेहुब तिच्यासारखी

दिसत असे. निजायच्या खोलीत ती तस्बीर पायगती टांगली अन् तिच्याभोंवती एक बकुळीची माळ अडकवली. 'इतक्या का माझ्या बाई सुरेख होत्या ? पर त्या जगल्या असत्या तर माझं ह्या घरांत येणं कसं झालं असतं ?' सगुणा ती तस्बीर पाहून म्हणाली.

तस्बीर लावल्यावर दोनतीन दिवसानी आनंदराव फिरतीवर गेला. दोन दिवसांनीं परत येणार होता म्हणून मी सगुणेच्या सोबतीला राहिल्यें. रात्री बारावर दोन वाजेपर्यंत मी तिला मंजुळेच्या गोष्टी सांगत होत्यें. मंजुळेच्या सीकपणांत आनंदरावानं घेतलेल्या आणाभाकादिखित मीं तिला सांगितल्या. कांही वेळानं मला झोंप लागली. पहाटेच्या वेळीं तिनं मला हालवून जागं केलं. ती म्हणाली, 'गिरजा, त्या तस्बीरींतली बाई डोळे फिरवती आहे नि ओठ हालवती आहे असा मला एकसारखा भास होतो आहे. यामुळं सारखी भीति वाटते अन् झोंप येत नाही. त्या तस्बिरीवर चादरबिदर टाकून तस्बीर झांकून टाक बरं.'

मी एका चादरीनं तें चित्र झांकून टाकलं, तेव्हां तिचा डोळा लागला. दुसऱ्या दिवशी आनंदराव परत आला अन् तें चित्र झांकलेलं पाहून रागावून म्हणाला, ' मीं तिचा फोटू एंजार करून आणला तो झांकून ठेवण्याकरतां का ? काढून टाका ते झाकण. ही अशीच इथें सदोदित नजरेसमोर दिसली पाहिजे. मेलेल्या बायकोचा त्रिसर पडणाऱ्या विसराळू नवऱ्यापैकी मी नाही.'

सगुणा म्हाणाली, 'मीं तो फोटू झांकवला तो त्यांच्याकडे मला बघवत नाहीं किंवा त्यांचा मला हेवा वाटतो म्हणून नाही, पण एकटी असतांना मला भीति वाटती म्हणून मी तो झांकवला. त्याबद्दल आपण राग मानूं नये.'

आनदराव म्हणाला , 'हा वेडे ! भीति वाटण्यासारखं त्यांत काय आहे ? समज मंजुळा जरी पिशाच्चरूपानं वावरत असली तरी ती तुझ्या

केसालाहि धक्का लावणार नाही. किती प्रेमळ अन् ममताळू मुलगी होती ती ! तिचं भय कशाला बाळगतीस ? उलट दुसऱ्या भुतांखेतांपासून तुझं ती रक्षणच करील.'

त्या दिवशी रात्री घोड्यावरून उस्मान दवडतच आला. त्यानं सांगितलं, 'तीन कोसांवार पळसाच्या जंगलांत मोठा वणवा पेटला आहे. अन् विझवण्याकरितां ताबडतोब निघालं पाहिजे.' लगेच बाईच्या सोबतीकरतां मला बोलावून आणलं अन् आनंदराव वणवा पेटला होता तिकडे निघून गेला. सगुणा खाटेवर निजली. तस्बीर डोळ्यांपुढें दिसूं नये म्हणून तिनं तिच्याकडे उसं केलं. अन् मीं जवळच भुईवर रकटं टाकून पडल्ये. त्याबरोबर मला गाढ झोंप आली. थोड्या वेळानं सगुणेची किंकाळी ऐकून मी दचकून जागी झाल्यें. 'गिरजा, मला घट्ट धर. ती पहा माझा गळा दाबती आहे,' असं ती बडबडूं लागली. मीं तिला धीर दिला अन् तिचा हात घट्ट धरून ठेवला, तेव्हां तिला झोंप लागली. आनंदराव पहाटे परत आला तेव्हां त्याला मी सर्व प्रकार सांगितला. तो हांसून सगुणेला म्हणाला, 'हे सगळे दुबळ्या मनाचे खेळ आहेत."

सगुणा म्हणाली, ' दुबळ्या मनाचे खेळ असले तर हा पहा माझ्या गळ्याला करकोचा पडला आहे. तो मनानं कसा पडेल ! '

आम्हीं पाहिलं तर खरोखरच तिच्या गळ्याला फांस बसल्यासारखा वळ उमटला होता. सोन्याच्या माळेंत गुंफलेलं मंजुळेचं मंगळसूत्र सगुणेच्या गळ्यांत घातलेलं होतं अन् त्यानंच तिचा गळा आंवळल्यासारखा दिसत होता. नुसत्या मनानं असा प्रकार होणं शक्य नव्हतं.

' तुम्ही मला सोडून जाऊं नका; म्हणजे मी कोणाला भिणार नाहीं. ' सगुणा म्हणाली.

' सगुणे, माझी नोकरी फिरायचीच आहे. फिरणं टाळून कसं चालेल ! मंजुळेप्रमाणं तूं घोड्यावर बसणारी असतीस तर तुला बरोबर

नेलं असत. पण तूं एखाद्या जुईच्या फुलासारखी नाजूक आहेस. तूं घरांतच राहिलेलं चांगलं. आतां एवढं करतों की, तुझ्या सोबतीला गिरजा-सारखीच आणखी एक बाई ठेवतों, मग तर नाहीं ना कांही हरकत !''

पुनः आनंदराव फिरतीवर गेला. मंजुळेची तस्बीर तो येईपर्यंत काढून बाजूला ठेवावी असं मला वाटलं, पण धनीण म्हणाली, 'ही तस्बीर नुसती झांकून ठेवलेली तिकडे आवडत नाहीं, तर बाजूला काढून ठेवलेली त्यांना पसंत पडेल ? माझं काय व्हायचं असेल तें होईल, पण त्यांच्या मनाविरुद्ध कांही एक करायचं नाहां.'

दुसऱ्या दिवशीं अष्टमी होती. सकाळपासूनच तिचा चेहरा फिका अन् घाबरल्यासारखा दिसत होता. सकाळच्या चहाला तिनं तोंडबी लावलं नाही. मला विचारलं, 'गिरजा, मंजुळाबाई वारल्या ती अष्टमीच होती ना ? अष्टमीच्या चंद्राचीच शपथ घेऊन त्यांनी दुसरं लग्न करणार नाहीं असं तिला सांगितलं होतं ना ?'

माझ्या तोंडांत थप्पड मारल्यासारखं मला झालं. कुठून मला बुद्धि झाली ह्या पोरीला ती गोष्ट सांगायची असं मला वाटलं. तिला धीर द्यायसाठी मी म्हणाल्यें, 'बाईसाहेब, धन्यांनी शप्पत घेतली ती मंजुळा-बाईचं समाधान व्हावं म्हणून घेतली होती. आतां त्या मेल्यागेल्या तशी शप्पत बी सुटली ! कशाला तुम्ही भितां ? मेलेलीं माणसं का पुन्हा येतात मोडलेल्या शपतांबद्दल शिक्षा करायला ? '

सगुणा म्हणाली, 'गिरजा, मंजुळाबाईचं पिशाच्च रोज रात्री माझ्या मानगुटीला बसतं.'

' पण बाईसाहेब, तुम्ही काय केलं आहे ? तिची शप्पत मोडली ती कांही तुम्हीं नाही.' मी म्हटलं.

' गिरजा, बायकांचीं अंतःकरणं बायकांना समजायला पाहिजेत. पुरुषांनी जरी अपराध केला तरी बायका त्याला शिक्षा करायच्या

नाहींत अन् त्यांच्यावर सूड उगवायच्या नाहीत. पुरुषांनी करावं नि बायकांनीं भरावं, हा जगाचा न्याय पुराणापासून चालत आलेला आहे. आज रात्रीनंतर मी रहायची नाही. धन्याला नीट संभाळ अन् म्हणावं तुम्हाला तिसरी बायको करायची असली तर खुशाल करा, सगुणा तिच्या वाटेला जाणार नाही,' सगुणा म्हणाली.

तिला थोड्या वेळानं फीट आल्यासारखी मला वाटली. बंगल्यावरच्या शिपायाकडून डॉक्टरला बोलावून आणलं अन् आनंदरावाला बोलावणं धाडलं. डॉक्टरनी येऊन विंजक्शन दिलं अन् मला सांगितलं, 'तिच्या डोक्यावर कुलुंग वॉटरची घडी ठेव अन् हा डोस तीनतीन तासांनीं दे.' डॉक्टर संध्याकाळी निघून गेला. आनंदरावाचा पत्ता नव्हता. दिवस मावळला तेव्हा अष्टमीचा चंद्र माथ्यावर चमकत होता. रात्रीच्या चार घटका गेल्यावर तो सगुणेच्या निजायच्या खोलीतून नजरेस पडला. रातकिड्यानीं किरकिर सुरू केलीच होती. सगुणेच्या गळ्यांत मंजुळे-चंच मंगळसूत्र होतं. रातच्या अकरा वाजता तिनं डोळे उघडले. चन्द्राकडे थोडा वेळ तिनं बघितलं अन् मग किंचाळी फोडली, ' नका हो बाई, माझा गळा आवळूं !' असं ती ओरडली. 'बाईसाहेब, इथं कोणी नाही. मी गिरजा नि गोविंदा शिपाई आहों, घाबरू नका,' असं म्हणून मी तिच्या तोंडांत चमच्यानं घोट घालायला गेल्यें. एवढ्यांत तिनं आपल्याच दोन्ही हातानीं मंगळसूत्राची माळ पकडली अन् त्या माळेनं आपला गळा आवळला. तिची मगरमिठी इतकी जबरदस्त होती कीं आम्हां दोघांना ती सैल करतां आली नाही नि ती सैल व्हायच्या अदुगरच तिचा जीव तिची कुडी सोडून गेलेला होता !

ती मेली त्याच क्षणीं आनंदराव बंगल्यावर पोंचला. झालेला प्रकार पाहून त्याची कंबर खचली. एक शब्दही त्याच्या तोंडांतून निघाला

नाही. दुसऱ्याच दिवशीं तो रजेवर निघून गेला, पण इथें परत आला नाहीं. कुठें असेल आतां तें पांडुरंगाला माहीत !"

गोष्ट ऐकल्यावर मी गिरजेला विचारलें. "गिरजाबाई, तुमची गोष्ट खरी आहे, पण मला इतकीच शंका आहे. मंजुळेनं खोटी शपथ घेणाऱ्या आनंदरावाला शिक्षा न करतां निरपराधी सगुणेला कां छळलं ?"

आपली मोळी डोक्यावर चढवीत ती म्हणाली, "तें बायकांचं शास्तर वेगळंच आहे, बाबा. बाप्पानूला नाही तें समजायचं ?"

# नबाब-साहेबांची कविता : : २

शायराबादचे नबाबसाहेब स्वतःला शायर (कवि) म्हणवून घेण्यांत कृतार्थता मानीत. नबाबसाहेबांना इतर व्यसनें माफक प्रमाणांत होतींच, पण कविता करण्याचे व्यसन त्यांना अजमीरच्या राजकुमार विद्यालयांतएका महाराष्ट्रीय संस्थानिकपुत्राच्या संगतीनें लागलें होतें. ह्या राजकुलीन कवींनें आपल्या कवितांचा जाडजूड संग्रह आणि त्यांच्या-बरोबर अभिप्रायांचा संग्रह अशी दोन लठ्ठ पुस्तकें प्रसिद्ध केलेलीं जेव्हां नबाबजाद्यांनीं पाहिली तेव्हां आपणहि आपल्या भाषेंत काव्य रचून सर्वांची वाहवा मिळवावी असें त्यांस वाटूं लागलें. रोज एक तरी गीत रचल्याखेरीज हुक्का ओढायचा नाही, अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली.

नबाबजाद्यांचे अब्बाजान पैगंबरनिवासी झाल्यावर ते नबाबसाहेब झाले. रोज रात्रीं एकक विता ते रचीत. सकाळीं फार लवकर म्हणजे पहांटे अकरा वाजतां ते निजून उठत. त्या वेळीं संस्थानचे वजीर, काजी, पंडितजी, चीफ मेडिकल ऑफिसर वगैरे बडे अम्मलदार दिवाण-इ-खासमध्यें जमत असत व नबाबसाहेबांचा ए. डी. सी. हातांत कवितेचा कागद घेऊन एकेक ओळ वाचून दाखवीत असे. एकेक ओळ वाचून होतांच अम्मलदारांच्या तोंडून स्तुतीचा मुसळधार पाऊस

पडायला प्रारंभ व्हायचा. नबाबसाहेबांनी आपल्या खास बैठकींतून बाहेरचें पहाण्यास व ऐकण्यास एक झरोका ठेविलेला होता. त्यांतून ते सर्व स्तुतिपाठ ऐकून घेत असत. एक दिवस ए. डी. सी. नें कवितेची एक ओळ वाचली :—

गूलोमें गूल चमेलीका गूल ।
मेरे चमनमें लाया इष्कका मूल ॥

"नबाबसाहेबकी पसंदगी चमेलीके सफेद फूल उपर बिराजी है. दुसरेभी बहोत रंगी-बेरंगी फूल होते है"—चीफ मे. ऑ. म्हणाले.

घसा खरडून 'ख' चा उच्चार करीत काजीसाहेब म्हणाले, "खानदानीके शायरकी कबीत भी ऐसी खानदानीकी होती है. नहीं तो आजकलके लाल डगलेवाले शायर देखो कंगाल भिकारी पत्थर के उपर कबीत करते है."

ए. डी. सी. नें कवितेच्या पुढल्या दोन ओळी वाचून दाखविल्याः—

और मेरा कलीजा झुलता है ।
जैसा झेलमका उपरका झुलता पूल ॥

ह्या ओळी ऐकतांच मे. स्टेट एंजिनीयरसाहेबांचें काळीज खुललें, पण त्यांची जीभ लंगडी असल्यानें 'वाहवा ! वाहवा ! काय नामी कल्पना आहे !' अशा अर्थाचे उद्गार त्यांनीं अडखळत काढिले. (हे उद्गार आणि ह्या गोष्टीच्या बाकीच्या भागांतील उद्गार मूळ उर्दूत न देतां मराठीत देण्याचें कारण लेखकाचें उर्दूचें अज्ञान हें नसून वाचकांस उर्दु समजणार नाहीं अशी त्याची भीति हें आहे.)

पंडितजी म्हणाले, "वा ! नबाबसाहेबांची प्रतिभा कालिदास किंवा महमद तघलक यांच्यापेक्षांहि श्रेष्ठ आहे. झेलमच्या झुलत्या पुलाची उपमा त्या दोघांपैकीं एकाला तरी सुचली पाहिजे होती."

" ओहो ! रविंद्रनाथ टागोर जब अमारे हजरतकी कबीत देखेंगे तब आपनी सब पोएट्री नदीमें फेक देएंगे," काजीसाहेबांनीं वक्तव्य केलें.

" बिलकुल सच !" असे उद्गार सर्वांच्या तोंडून निघाले. नबाबसाहेबांना आपल्या कृतीबद्दल धन्यता वाटूं लागली. त्यांनीं दररोज एक कविता रचण्याचा आंणि आश्रितांकडून स्तुतिपाठ ऐकवून घेण्याचा सपाटा लाविला.

सातआठ दिवसांनी त्यांनी एक गझल रचिलें, त्यांतील शब्द खालीलप्रमाणें होते:—

किसीका दील पलटा है
किसीके ऑख मिटते है
किसीका जुस्म तिस्मर है
किसीकी चामपोशी है ॥
चुपचाप चुराया किसीने मेरा हिरदे न जाने
सजा देऊंगी उस्को मेरे हिरदेके जेलखाने
और जो चीज चोरी है उसमेंही उस्कू मै
बंदीमें डालूंगी मैं इनसाफ देनेवाली ॥

किसीका—इत्यादि.

गझलाची एकेक ओळ पाठ म्हणून भाविकपणाचें सोंग आणणारे श्रोते, कवीवर खुशामतीच्या नकली फुलांचा वर्षाव करीत होतें. 'नबाबसाहेबांच्या कवितांचें इंग्रजी भाषांतर केल्यास त्यांस नोबेल प्राइज हटकून मिळेल व हें इंग्रजी भाषांतर आपला भाचा प्रो. ओझा (इस्लाम कॉलेजमधील इंग्रजी, इतिहास आणि रसायनशास्त्र यांचा अध्यापक) हजार बाराशें रुपयांइतका अल्प मोबदला घेऊन सहज करूं शकेल.' असें एक्झीक्युटिव एंजिनिअरांनी सांगितलें. नबाबसाहेब खूष झाले. रोज एक कविता रचावयाची आणि सकाळी वाड्यांत जमलेल्या बड्या

लोकांनी तिची एकेक ओळ समुदायानें पाठ म्हणून माना डोलवीत, "वाहवा, क्या बात है !" इत्यादि उद्गारांचा पाऊस पाडावयाचा असा क्रम चालू झाला.

नबाबसाहेबांना त्यांच्या चौथ्या लग्नाच्या वेळी एक सुंदर दासी सासऱ्याकडून आदण मिळाली होती. परंतु चौथ्या बायकोपेक्षां ती अधिक सुंदर असल्यानें तिचें दर्शन किंवा तिच्या शब्दाचें श्रवण ह्यांचा लाभ त्यास मिळूं न देण्याविषयी बेगमसाहेब दक्षता बाळगीत. त्यामुळें चिडून जाऊन नबाबसाहेबांनी खालील भावगीत रचिलें :—

हजार आंखवाले इंदर कर मेरेको अल्ला
जिनसे उस्की सूरत देखूंगा आंख भरभरके ॥
और मेरे छोटे कानोंसे आवाज सुनकेही
नही खुषी हो पैदा; मेरे कान लंबे कर दे ॥

ह्या कवितेचें विवरण नबाबसाहेबानीं स्वतः केलें आणि त्याचे परिणाम बिचाऱ्या दासीस भोगावे लागले.

एके दिवशीं हजरतांची तब्येत नादुरुस्त झाली, अंमलदार आणि शेठसावकार नबाबमंझिलांत हजरतांचें काव्य झेलण्याकरितां जमले. ठराविक वेळी ए. डी. सी. आला व त्यानें जाहीर केलेः "साहेबों, आज हजरतकी तब्यत जरा हुई है बीमार."

सर्व लोकांस वाटलें आजच्या कवितेचा हा पहिला चरण आहे. म्हणून ते सर्व समुदायानें म्हणूं लागले, "साहेबों, आज हजरतकी तब्यत जरा हुई है बीमार."

ए. डी. सी. रागानें म्हणाला, "अरे क्या पागल हो आप सब मुरब्बी लोग !"

सर्वजणांनीं अनुवाद केला, "अरे क्या पागल हो आप सब मुरब्बी लोग !"

पंडितजी म्हणाले, "सच बात है. आज कल सब लोक पागलही हुए हैं."

काजीसाहेब म्हणाले, "वाहवा, वाहवा! हजरतने कितनी बडी बात कही है दुनिया एक बडा पागलखाना हो रहा है."

ए. डी. सी. चिडून ओरडला, "हैवानो! आज कबीत नहीं हैं तैयार."

पुनः एकदां सर्वांनीं म्हटलें, "हैवानो, आज कबीत नहीं है तैयार! वाहवा! क्या मजा है!"

चीफ मेडिकल ओफिसर म्हणाले, "कितनी अच्छी बात है!"

वझीरसाहेब म्हणाले, "बीमार और तैयार जुलता है."

झरोक्यांत बसून हा प्रकार पहात असलेल्या नबाबसाहेबांचा क्रोध अनावर झाला. ते बाहेर आले आणि म्हणाले, "फुलीश मॅन्स! आज कविता तयार नाहीं असं अन्वरूद्दीन (ए. डी. सी.) घसा फोडून सांगतो आहे अन् तीच कविता असं तुम्ही समजतां आहां. कविता समजण्याची लायकी तुमच्यांत नाहीं म्हणून उद्यापासून कविता बंद! सकाळच्या वेळी आपलीं काळी तोंडं घेऊन माझ्या महालांत येऊं नका यापुढें."

पीडा टळली असें सर्वांस वाटलें. नबाबसाहेबांनीं कविता करण्याचें बंद केलें आणि तेव्हांपासून ते सकाळीं टेनिस खेळूं लागले.

## आरोग्यमातेचें मंदिर : : : ८

बाळासाहेब सरदेशपांडये स्टेशनवर पॅसेजर गाडीची वाट पहात इकडून तिकडे हिंडत होते. स्टेशनचें नांव सारवाडी असें आहे. हें छोटेखानी गांव बाळासाहेबांच्या जहागिरीचे मुख्य ठिकाण, गोदावरीच्या कांठी वसलेलें आहे. पॅसेजर गाडीनें कुमारी अंबूताई अक्कलकोटकर, बी. ए., बी. टी., टी. डी. (मॅंचेस्टर) ह्या आपल्या मित्राचें गांव पाहण्याकरितां आणि नाताळची सुट्टी घालविण्याकरितां येणार होत्या.

गाडी एक तास उशिरां येऊन दाखल झाली. दुसऱ्या वर्गाच्या डब्यांतदेखील चिकार गर्दी झाली होती. थंडीचे दिवस असूनहि अंबूताई घामाघूम होऊन गेल्या होत्या. त्यामुळें सारवाडी केव्हां येते आणि आपण ह्या मेंढवाड्यांतून केव्हां सुटून बाहेर मोकळ्या हवेंत येतों असें त्यांना झालें होतें. मोठ्या कष्टानें त्यांनीं डब्याच्या गर्दीतून वाट काढीत स्टेशनच्या ओट्यावर पाऊल टाकलें. तोंच बाळासाहेबानीं त्यांच्याकडे जाऊन सामानाची चौकशी केली.

"सामान काय असायचं, बाळासाहेब ? ट्रॅव्हल लाइट असा हुकूम निघाला आहे ना सरकारचा ? माझ्याजवळ फक्त एक बॅग नि एक रग्

आहे, तेवढं नोकराकडून बाहेर काढवा म्हणजे झालं." अंबूताई म्हणाल्या.

त्यांच्या शेजारीं बसलेल्या सहप्रवाशांनी खिडकींतून त्यांचें सामान बाहेर देत म्हटलें, "हियर इज युअर रॅग ॲंड धी बग, मिस्..."

त्याच्या स्पूनरोक्तीमुळें अंबूताईस आणि बाळासाहेबांस फार हंसूं आलें. त्यांनी त्यांच्या हातून त्या दोन जिनसा घेतल्या. स्टेशनच्या बाहेर बाळासाहेबांचा उघडा टांगा तयार होता. त्यांत तीं दोघें बसलीं आणि बाळासाहेबांनी आपलें सारथ्यकौशल्य दाखवून अंबूताईस चकित करण्याच्या हेतूनें घोड्यांचे लगाम व चाबूक पकडून नोकरास सांगितलें, "गणप्या, तूं मधल्या वाटेनं म्होरं जा. मी टांगा चालवतों."

गणप्यानें अंबूताईकडे कुचेष्टायुक्त कटाक्ष फेंकला आणि मधली वाट धरली.

चाकोरीच्या वाटेनें ठेचाळत आणि उडया मारीत टांगा चालूं लागला. अंबूताईनी बैठक घट्ट धरून ठेविली होती तरी प्रत्येक खड्ड्यावरून किंवा धोंड्यावरून टांगा जात असतां त्या बसल्या जागीं टणाटण् उडत होत्या. आणि सामानहि मालकिणीचें तंतोतंत अनुकरण करीत होतें.

"अंबूताई तुम्ही कबूल केल्याप्रमाणं आमच्या साखरवाडीला पायधूळ झाडायला याल कीं नाही याची मला शंका वाटत होती." बाळासाहेबांनीं प्रस्तावना केली.

"पायधूळ झाडायला बाहेरून कशाला कोणी यायला पाहिजे, बाळासाहेब ? ह्या तुमच्या जहागिरीत धूळ काय कमी आहे ? उलट मुंबईत डांबरी रस्ते झाल्यापासून पायधूळ म्हणजे काय हें आम्हांला समजेनासं झाल आहे." मुंबईतले डांबरी रस्ते जसे कांहीं आपणच घडविले आहेत अशा ऐटीनें अंबूताई म्हणाल्या.

"आमच्या गांवाला धूळ भरपूर आहे हें खरं; पण त्याच्याबरोबरच इथली जमीन पहा किती सुपीक आहे ती ! ही पहा कापूस, तूर अन् जोंधळ्याची शेतं दुतर्फा लागून राहिली आहेत. जागोजाग विहिरी असल्यामुळं पानमळे अन् फळबागासुद्धां इथें पुष्कळ आहेत." हातांनी आपल्या जहागिरीचें वैभव अंबूताईस दाखवीत बाळासाहेब बोलत होते.

गावची शोभा पाहून अंबूताईस फार आल्हाद वाटत होता. वाटेनें भेटणारे बहुतेक लोक बाळासाहेबांस लवून रामराम करीत होते आणि बाळासाहेबांचा टांगा जवळून जात असतां बायका त्याच्याकडे पाठ करून आणि डोकीवर पदर घेऊन उभ्या रहात होत्या. ह्या खेडवळांचं वर्तन किती मर्यादशील दिसत होतं ! उलट मुंबईस बाळासाहेबांसारख्या मातबर माणसाला देखील रस्त्यानें जातांना लोकांचे धक्के खात वाट काढावी लागते. थोड्याच वेळानें शेतांतली वाट संपून टांगा गांवांत शिरला. गांवाच्या मध्यभागी असलेल्या जहागीरदारांच्या मोठ्या वाड्याशीं टांगा थांबला. आंतले दोघे उतारू उतरून वाड्यांत शिरले. दिवसाचा राहिलेला भाग स्नान, भोजन आणि विश्रांति यांत गेल्यावर संध्याकाळच्या वेळीं सारवाडींतील चार प्रतिष्ठित लोक बाळासाहेबांस भेटण्यास वाड्याच्या ओसरीवर जमा झाले. हवापाणी, युद्धवार्ता, अन्नधान्यचर्चा इत्यादि झाल्यावर शास्त्रीबोवा नाकांत तपकीर कोंबीत म्हणाले: "बाळासाहेब, आपल्या गांवांत हल्लीं एकहि देऊळ नाहीं. एक देऊळ बांधण्याकरितां भाऊसाहेबांनीं दहा हजार रुपये पुनमचंद शेटजींकडे ठेवले होते. ते आतां व्याजासकट पंधरा हजारांच्यावर गेले आहेत. मी म्हणतों, गोदावरीच्या कांठीं एक छानदार शिवमंदिर स्थापन करावं, त्याला योग्य अशीच आपल्या गांवाची मांडणी आहे. शिवाय ('शिवाय' शब्दावर जे आहे ते श्लेष आहे !) सरकारनं एक मंदिर बांधायची परवानगी सोडलेली आहे."

पुनमचंद शेटजी म्हणाले, "शास्त्रीबोवा, शिवमंदिर सगळ्या लोकांना कामाला येण्यासारखं नसतं. त्यापेक्षां रामचंद्रजीचं किंवा राधाकृष्णाचं देऊळ बांधावं. साधारण लोकांच्या अंतःकरणांत रामाची अन् कृष्णाची भक्ति असते! पण शंकराची जरा कमी असते. माफ करा, पण खरी गोष्ट अशी आहे."

हैबती म्हणाला, "त्यापक्षीं इटुबाचं देऊळ बांधा, धणी; म्हंजी समद्या जातीच्या लोकांना भजन करायला फार उत्साव वाटेल. इटुबा हाच समद्या हिंदु लोकांचा देव हाये पगा, रावासून रंकापर्यंत."

इब्राहिम तांबोळी म्हणाला, "कोणाचा बी देऊल बांधा, जहागिरदार-साहेब, पर पंधरा हजारांतल्या पांच हजारांचा तरी उप्योग मुसल-मानांच्या कामांत झाला पाहिजे. आमच्या मशिदीची डागडुजी झाली पाहिजे, नाहीतर नवा इदगा तरी बांधून मिलाला पाहिजे."

"आपल्या सारवाडीत मुसलमानांचीं घरं तीनच आहेत नाही का, इब्राहिम?" बाळासाहेबांनीं विचारिलें.

"तीनच घरं असले म्हणून काय झालं? धरम नर निराला आहे ना? लहान भाऊ असला तरी त्याला पैशाची वांटणी मोठ्या भावाच्या इतकीच मिलते की नाही? आमचे जिनासाहेब हेंच सांगून राह्यले आहेत." इब्राहिमनें उत्तर दिलें.

"देऊळ कसलं बांधायचं? त्याऐवजीं सिनेमा थिएटर, नाहीं तर छानदारसं काफे हाऊस बांधा, बाळासाहेब. सगळी देवळ पाडून टाकावीं मग तीं हिंदूंचीं असोत की मुसलमानांचीं; असं मत प्रस्थापित होत असतांना देवळं बांधायची गोष्ट काढणं हें आपल्या बुद्धीला बुरशी आल्यासारखं वागणं नाहीं काय?" नवमतवादी युवक भाई अरविंद म्हणूं लागला. तोंच इब्राहिमनें त्याला हटकलें, "ए भाई, तूं हिंदूंच्या

देवळाबद्दल काय वाटेल तें बहक ; पण आमच्या मशिदी पाडाव्या असं पुनः बोललास तर जीभ छाटली जाईल एका क्षणांत."

भाईचा जोर बराच ओसरला आणि तो म्हणाला, "राह्यलं, कोणाच्या भावना दुखवण्याचा माझा विचार नाही; पण देऊळ बांधायचंच असेल तर त्यांत मार्क्सची मूर्ति स्थापन करून शिखरावर लाल झेंडा उभारावा, असं माझं मत आहे."

बापू महारानें सूचना केली, "मरीआईचं देऊळ बांधा सरकार म्हंजे आपल्या गाव्वांत दरसाल पटकीची साथ येती ती बंद होऊन जाईल. द्येवा, मरीआईचं देऊळ आपुन बांधलं तर आम्ही गांवची महार मंडळी दर पुनवेला एक कोंबडा देवीला वहात जाऊं, सरकार."

म्हाळसाबाई पुरुषे (थर्ड इयर ट्रेन्ड शिक्षिका) म्हणाल्या, "पुरे झालं, जिथें तिथें पुरुषांचा वरचष्मा! देव झाले तरी शंकर, विष्णु, गणपति नाहीं तर म्हसोबा! खरोखरीचा देव पुरुष नसून बायकोच असला पाहिजे, असं माझं मत आहे."

"म्हनून तर म्हटलं आहे इटाबाई माऊली माय माझी इटाबाई माऊली." बापू महार कुचेष्टेनें म्हणाला.

"करा थट्टा; पण मी सांगत्यें जर देव इतका दयाळू, मायाळू अन् उदार असला तर तो आईच्या स्वरूपांतच असला पाहिजे. सगळे धर्मसंस्थापक मेले पुरुषच ना! म्हणून प्रत्येक धर्मात देव पुल्लिंगी आहे. मी सांगत्यें, जहागीरदारसाहेब, जगन्मातेचं देऊळ बांधा, तीच खरी जगत्कर्ती आहे—" श्री. म्हाळसाबाई.

बाळासाहेब म्हणाले, " मंडळीहो, सगळयांच्या सूचना मीं ऐकल्या आहेत अन् त्यांचा विचार करूनच आपल्या सर्व समाजाला उपयोगी पडणाऱ्या अशाच देवतेचं देऊळ मी इथें बांधीन बरं. आतां आपण दुसऱ्या विषयाकडे वळूं. आपल्या गांवांत रेशनिंग सुरू करण्याबद्दल

तालुकदारसाहेबांनीं लिहून पाठवलं आहे. त्यासंबंधांत आपग कांहीं केलं पाहिजे ” ..................

*       *       *

“हिवाळ्यांतली सकाळची वेळ किती रमणीय असते! कितीहि हिंडलें तरी थकवा येत नाही; कितीहि खाल्लें तरी जाड्य वाटत नाहीं आणि वाटेल तितकें काम केलें तरी कंटाळा येत नाहीं. नदीकांठच्या प्रदेशावरील वनश्री ह्या दिवसांत धुक्याचें घुंगट आपल्या सौंदर्याभोंवतीं लपेटून रसिकाची दिदृक्षा द्विगुणित करिते.” असें कु. अंबूताई अक्कलकोटकर यांचें सेकंडरी ट्रेनिंग कॉलेजांत पढविलेलें मत होतें. ही वनाची शोभा पाहण्याकरितां त्यांनी बाळासाहेबांस बरोबर घेऊन गांवाबाहेर पाऊल टाकलें. “गालांना आणि उघड्या हातांना सुया टोचणारी थंडी आपल्याला ली नदीच्या कांठावरील हिंवाळ्याची आठवण करून देत आहे.” असे उद्गार त्यांनीं काढले. बाळासाहेबांनी विचारलें, “आपण ली नदीच्या कांठी जाऊन आलां आहां हें नव्हतं मला माहीत.”

“मला पण नव्हतं माहीत! मी खरोखरीच ली नदीच्या कांठीं कधीं गेल्यें नव्हत्यें— ” अंबूताई.

“मग काय म्हणालांत की ली नदीच्या कांठची आठवण होते म्हणून!”— बाळासाहेब.

“आमच्या शिकवायच्या पाठांत लीच्या कांठचा हिंवाळा म्हणून एक धडा आहे. त्या धड्याची आठवण झाली. प्रत्यक्ष लीचा कांठ पहायला नव्हत्यें गेल्यें मी!” असें म्हणून अंबूताई खिदळूं लागल्या.

त्यांचें खिदळणें ऐकून बाळासाहेबहि हांसूं लागले. तरुण मंडळींना हांसण्याला कांहीं विशेष कारण लागत नाही. ‘हास्याकरितां हास्य’ ही त्यांची व्याख्या असते. हांसतांना मध्येंच थांबून अंबूताईनीं जिज्ञा-

सेनें विचारिलें, "अगबाई, ही माणसं हातांत लोट्या घेऊन कुठें चालली आहेत ! दूध आणायला की काय ?"

"विचारा की समोरून ती शेवंतीबाई शिंपीण येती आहे तिला." बाळासाहेब.

तरुण वयाची शेवंतीबाई ओचे खोवून आणि डोक्यावर पदर घेऊन समोरून येत होती. अंबूताईंनी तिला "बाई, तुम्हीं तपेली घेऊन कुठें गेलां होतां !" असें विचारिले. त्यासरशी मानेला जोराचा हिसडा देऊन आणि 'इश्श' असा उद्गार काढून तिनें आपली वाट धरली.

नदीचें पात्र दिसूं लागलें, आपण गोदावरीच्या पवित्र प्रवाहाच्या शेजारून फिरावें अशा इच्छेनें अंबूताईंनी बाळासाहेबांस जवळ जवळ ओढीतच नेलें म्हणा ना ! नदीच्या कांठानें जाण्यास ते नाखुष कां आहेत हे ताईंना समजेना. पात्रांतील मऊ वाळूंतून चालतांना अंबूताईस फारच मौज वाटली. 'सँड्स् ऑफ् दि डी' ह्या कवितेची आठवण त्यांना झाली. तिच्यांतले सुंदर चरण म्हणत त्या चालल्या. त्यांच्या चाहुली-मुळें पाण्याच्या कडेशीं उभा राहून बकध्यान लाविलेल्या एका दुष्ट बगळ्याचें ध्यान भंगून तो हवेंत उडाला. आपल्यामुळें निदान दहापांच माशांचा जीव वांचला असें समाधान त्यांनी व्यक्त केलें. दहावीस पावलें गेल्यावर एक अत्यंत रमणीय स्थान त्यांच्या दृष्टीस पडलें. सातआठ बकुळीच्या झाडांनीं आपला वर्तुलाकृति कुंज बनविला होता. त्या कुंजाच्या मध्यभागीं एक काळ्या दगडांचा सुंदर चौथरा बांधलेला होता. चौथऱ्याच्या मध्यावर कोणाच्या तरी पादुका स्थापन केल्या होत्या. एक बारीकसा ओहोळ चौथऱ्याच्या अंगानें वहात येऊन नदीला मिळालेला होता.

"अहाहा, किती रमणीय ठिकाण आहे हें ! चला, आपण घटका-भर ह्या चौथऱ्यावर बसूं. असलं मनोहर स्थळ युरोपांत असतं तर

लोकांची झुंबड त्याच्यावर बसायला तुटून पडली असती. पण आमच्या अरसिक ठोंब्यांना काय तिची किंमत !" —अंबूताई.

माझे पांचवे पूर्वज पांडुरंग सुंदर म्हणून होते. त्यांची ही समाधि. उदगीरच्या लढाईत निजाम सरकारच्या बाजूनं ते लढतांना पडले, म्हणून आम्हांला ही जहागीर मिळाली." समाधीला नमस्कार करीत बाळासाहेब म्हणाले.

ह्या रम्य स्थळी अंबूताईच्या सहवासांत घटकाभर बसावयास मिळणार ह्या अपेक्षेनें बाळासाहेबांस अतिशय आनंद झाला. आजच्या ह्या सुप्रसंगाकरितांच आपल्या पूर्वजांनी ही समाधि आणि तो चौथरा बांधिला असावा असे त्यांस वाटलें. दोघांजणांनीं लगेच चौथऱ्याकडे मोर्चा फिरविला आणि हातरुमालानें तेथील धूळ झटकून दोघेंहि त्याजवर पाय खाली सोडून बसलीं. खेड्यांतील स्वच्छ, निरोगी रहाणीची वाखाणणी करतां करतां अंबूताईंनीं चौथऱ्याखालील भुईस पाय टेकले तोंच त्यांना वसकन् घाण आली. आपल्या पायांतील मखमाली चपलांकडे त्यांनीं पाहिलें तों त्या पावलासकट एका अत्यंत घाणेरड्या पदार्थानें माखलेल्या दिसल्या ! " ई बाई ! इश्श, काय मेली घाण ! कुणी मेल्यानं ....." असें ओरडत त्या जागच्या उठल्या. दोन्ही चपला पायांतून भिरकावून देऊन नदीच्या प्रवाहाकडे धांवत सुटल्या. पाण्यांत पाय किती वेळ धुतले तरी त्यांचें समाधान होईना. बाळासाहेबांनी दगडांनीं त्यांची पावलें घांसून स्वच्छ केली; परंतु ह्या स्थितीतल्या चरणस्पर्शानें त्यांना मुळींच आनंद झाला नाहीं.

"चला, आतां आपण पुढें जाऊं या." खजील झालेले बाळासाहेब त्यांना म्हणाले. पुढें चालतांना आणखी कांहीं रमणीय समाधि आणि देवळें लागली; परंतु गांवकऱ्यांनाहि देहशुद्धि करण्यास रमणीय स्थळांचीच आवश्यकता भासते असें त्यांच्या अनुभवाला आलें.

गोदावरीच्या कांठच्या साधुसंतांच्या समाधीचा उपयोग गांवकरी लोक आपलें शरीर विमल करण्याकरितां करीत असत. आमच्या भारतीय कुलांगना एरवी कितीहि विनयशील असोत, पण सकाळचे प्रहरीं नदीकांठावर बसलेल्या त्यांच्या पलटणी पाहणारास स्वतःचे डोळे झांकून घेतल्याशिवाय गत्यंतर नसतें. अंबूताईचा जन्म मुंबईत आणि इंग्लंदांत गेला असल्यानें त्यांस हा सर्व प्रकार दुःसह वाटला. त्यांतल्या त्यांत खुद्द जहागीरदारांच्या भव्य वाड्यांतदेखील बंद दारांचा सण्डास नाहीं असें जेव्हां त्यांच्या निदर्शनास आलें तेव्हां तर 'जी मुलगी पक्की निर्लज्ज असेल तीच तुमच्या या भिकारड्या सारवाडींत रहायला येईल,' असे रागाचे उद्गार काढून त्याच दिवशी रात्रीच्या गाडीनें त्यांनीं बाळासाहेबांच्या आर्जवास न जुमानतां मुंबईकडे प्रयाण केलें.

पुढील तीन महिने मोठ्या उद्योगांत बाळासाहेबांनी घालविले. हैद्राबादेहून शिल्पशास्त्रज्ञ आणून त्याच्याकडून नवीन मंदिराचा नकाशा बनविला. मंदिर कोणत्या देवाचें किंवा देवीचें बांधावयाचे आहे ह्याचा पत्ता त्यांनीं कोणासहि लागूं दिला नाही. प्रथम भोंवताली कोट बांधूनच आंतील मंदिराचें काम सुरू झालें. आपल्या एका विहिरीस पंप बसवून त्याचें पाणी त्यांनीं मंदिरास पुरविलें देवाचें तीर्थ वाहून जाण्याकरितां चांगली रुंद पन्हळ काढून ती नदींत सोडून दिली आणि बांधणीचें काम पूर्ण झाल्यावर एक शुभदिन पाहून मंदिराचे उद्घाटन कु. अंबूताई अक्कलकोटर यांच्या हातून करविण्याचें त्यांनीं ठरविलें.

उद्घाटन-समारंभास सरकारचे आरोग्य-अधिकारी डॉ. कत्तलखानजंग बहादुर, एम्.डी. (उस्मानिया), तालुकदारसाहेब उस्मानअली पाकिस्तानवाला, एम्. ए., एल्एल्. बी. (अलीगढ), तहसीलदारसाहेब यू. पी. रामस्वामी नायडू, बी. ए. इत्यादि प्रमुख अधिकारी उपस्थित होते. पडद्यामध्यें बाळासाहेबांच्या मातुश्री

गंगाजल निर्मल श्री. तुळजाभवानी सरदेशपांडये ह्या बड्या पाहुण्या स्त्रियांची बरदास्त ठेवीत होत्या. मंदिराचा उद्घाटन-समारंभ जातिधर्मातीत असल्यानें हिंदुमुसलमानांप्रमाणेंच नांदेडहून शीख भाई, तसेच नगरहून ख्रिस्ती बांधवहि आलेले होते. हें अभिनव पद्धतीचें मंदिर कोणत्या देवतेचें असेल याचें कौतुक सर्वजण आपापसांत करीत होते. उद्घाटन-समारंभाच्या अध्यक्ष कु. अंबूताई पडद्यांतून बाहेर येऊन अध्यक्षस्थानाशेजारी रिकाम्या असलेल्या खुर्चीवर बसल्या. संस्थानांत ज्या सभेला अंमलदार हजर असतात तीत आपली खुर्ची अंमलदाराने पटकावलेली पाहण्याचा प्रसंग अध्यक्षावर नेहमीं येतो. वरातीच्या वेळी वधूवरांस बाजूला ढकलून आपणच हत्तीवर विराजमान झालेल्या रियासती सुभेदाराची गोष्ट आमच्या वाचकांना परिचित असेलच. तथापि बाळासाहेबांनी त्यांस आगाऊ तशी सूचना देऊन ठेविली होती. निजामसरकारची स्तुति आणि मोगलाईगीत झाल्यावर बाळासाहेबांनी अंबूताईस भाषणास प्रारंभ करण्याची विनंति केली. ताई भाषण करीत असतां तिघे अंमलदार सिगारेटचा धूर सोडीत आपसांत बोलत होते. ताई म्हणाल्या:—

"आज माझ्या शाळेच्या वार्षिक परीक्षेचं महत्त्वाचं काम सोडून मी इथें आल्यें आहें तें कां? श्रीमंत इनामदारसाहेबांनी बोलावलं म्हणूनच केवळ नाही, पण माझ्या मनांतली फार दिवसांची महत्त्वाकांक्षा पूर्ण होण्याची वेळ आली आहे म्हणून मी इथें आल्यें आहें. गेल्या डिसेंबरांत मीं ह्या सारवाडीला भेट दिली. गोदावरीच्या रम्य तीरावरचं हें ठिकाण स्वर्गाप्रमाणें सुखकारक अन् स्वच्छ असेल असं मला वाटत होतं; पण तुम्ही ग्रामस्थ मंडळींनीं स्वर्गाचा नरक करून टाकलेला मला आढळला. दुर्दैवाची गोष्ट आहे कीं, महाबळेश्वर, माथेरान, मसुरी, सिमला यांच्यासारखी जी जीं हवा खाण्याचीं ठिकाणें

आहेत तिथें तिथें युरोपियन वस्ती आणखी देशी वस्ती ह्यांच्यांत स्वर्ग अन् नरक ह्यांच्याइतका फरक दिसून येतो-"

कत्तलखानसाहेब सिगारेट चघळत बोलले, "आपण ती दोन्ही ठिकाणं पाहून आलां आहां वाटतं?"

ताई हांसून म्हणाल्या, "मी स्वर्ग न् नरक प्रत्यक्ष पाहिली नाहींत, पण त्यांची वर्णनं वाचलीं आहेत. आमच्या ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणायचे, कुठल्याहि स्वर्ग-तुल्य ठिकाणाचा नरक करून टाकायचा असेल तर नेटिव्हांना त्यांत रहायला जागा द्यावी. दक्षिण आफ्रिकेंत गोरे लोक हिंदी लोकांना इतके कंटाळतात ते उगीच नव्हे. सांगायचा मतलब इतकाच कीं, गेल्या डिसेंबरांत मी इथें आल्यें होत्यें तेव्हां सारवाडीबद्दल माझ्या ज्या अपेक्षा होत्या त्या फोल ठरल्या. एक स्वच्छ, निरोगी हवाशीर गांव आपल्याला पहायला मिळेल असं मला वाटत होतं, त्याऐवजीं जिकडेतिकडे दुर्गंधि भरलेलं नि घाणेरडं खेडं माझ्या दृष्टीस पडलं. गांवां-तल्या बोळांच्या दुतर्फा लहानलहान पोरांच्या रांगा खुशाल प्रातर्विधीला बसलेल्या दिसल्या! डोळे मिटून नि नाकाला पदर लावून जावं तर पाय कुठें पडेल याचा नेम नाही. पहांटेच्या रमणीय प्रहरीं नदीवर आम्ही फिरायला गेलों तेव्हां तर हिंदी लोकांच्या अन् बायकांच्यासुद्धां विनयशीलपणाबद्दल पसरलेली कीर्ती खोटी ठरवणारं दृश्य मला पहायला लागलं. जेव्हां मी इंग्लंडांत होत्यें तेव्हां तिकडे असं गैरमर्यादशील वर्तन कधींहि मला दिसलं नाहीं. स्त्रीपुरुषांच्या मिश्र स्नानाच्या जागीं-देखील कमींत कमी इतका पोशाख अंगावर असलाच पाहिजे असा तिकडे निर्बन्ध असतो. कोठल्याहि साधूची समाधि किंवा पीराचं थडगं किंवा देवाचं देऊळ ह्यांचा उपयोग संडासाप्रमणें करण्याचा आपला जन्म-सिद्ध हक्क आहे.असा सारवाडीकरांचा समज दिसला. ह्या अत्यंत लज्जाविहीन

आणि घाणेरड्या संवयीचा मोड करणं हें तुमचं पहिलं कर्तव्य आहे, असं मीं इनामदारसहेबांना सांगितलं. ही गोदावरी किंवा तुम्ही म्हणतां ती गंगा वर्षांतून चारपांच महिने काय ती वहात असते. बाकीचे दिवस तिच्या डोहाच्या सांचीव पाण्यांतच तुमचे सगळे व्यवहार होतात. म्हशीचं नि माणसांचं न्हाणीघर, परटांचा धोबीघाट, पिण्याचं पाणी काढण्याचं तीर्थ आणि गांवांतलं सांडपाणी वाहून नेणारं गटार ही सगळीं कामं ह्या बिचाऱ्या गंगामातेवर एकटीवर कां बरं लादतां ? त्यामुळं गांवांत रोगराई फैलावते, वस्त्रहीन अवस्थेंत उघडया जागीं बसल्यानं नीतिमत्ता बिघडते नि गांवाच सौंदर्य नष्ट होतं. म्हणून आरोग्यमातेचं मंदिर स्थापण्याची विनंति मी इनामदारसाहेबांना केली अन् त्यांनीं ती मान्य केली. हिंदु, मुसलमान, शीख अन् ख्रिस्ती ह्या सगळ्याच लोकांना आरोग्यमाता पूज्य आहे. मंदिरांत तिचं वास्तव्य अध्यात्मरूपानं रहाणार आहे. मूर्तीच्या रूपानं नाहीं; म्हणून मूर्तिपूजक अन् मूर्तिभंजक अशा दोघांनाहि हे मंदिर पूज्य वाटेल अन् ते सकाळसंध्याकाळ आरोग्यमातेच्या सेवेला हजर रहातील अशी मला आशा आहे. इतकं बोलून ह्या सुंदर देणगीबद्दल आपण सर्वांनीं बाळासाहेबांचे उपकार मानले पाहिजेत असं सुचवून मंदिराचं उद्‌घाटन मी आतां करत्यें."

बाळासाहेबांनीं दिलेल्या चांदीच्या किल्लीनें अंबूताईनीं मंदिराचें कुलूप उघडतांच 'पुंडलीक वर दे हारि विठ्ठल'चा गजर झाला. दरवाजावर गणेशपट्टीच्या वरील बाजूस आरोग्यमातेचें चित्र रेखाटण्यांत आलें होतें. ही धष्टपुष्ट माता मांडीवर घेतलेल्या मुलास पाजीत आहे आणि जवळ दोनतीन पुष्ट मुलें खेळत आहेत असें तें चित्र जिवतीच्या चित्रांतील कल्पनेवरून रेखाटलें होतें. दरवाजा उघडून सर्व पाहुणे मंदिराच्या भव्य आवारांत गेले. आवाराच्या एका बाजूस तीस हात उंचीवर पाण्याचें टाकें बसविलें होतें व त्यांतून नळांनीं मंदिराच्या वेगळाल्या भागांत

पाणी खेळविलें होते. एका भागावर स्त्रियांकरितां आणि दुसऱ्या भागावर पुरुषांकरितां अशा पाट्या लाविल्या होत्या.

"ह्या मंदिरांत जातिभेद पाळण्यांत येत नाहीत असं आपण म्हणालां होतां, इनामदारसाहेब !" तालुकदार थट्टेनें म्हणाले.

"मनुष्यकृत जातिभेद आम्ही मानीत नाही. पण स्त्री आणि पुरुष हा ईश्वरी जातिभेद मात्र आम्हांला मानावाच लागतो!" बाळासाहेबांनीं उत्तर दिलें.

पाहुण्यांतील बायकामंडळी स्त्री-विभागांत व पुरुषमंडळी पुरुष-विभागांत शिरली. पुरुषविभागांत तीन पोटभाग केले होते. एक स्नानाकरितां, एक कपडे धुण्याकरितां आणि तिसरा प्रातर्विधीकरितां. कारंजाचे सहा संडास तयार केले होते, व उपयोग करणारानें त्यावर पाणी टाकून जाण्याचा निर्बन्ध ठेविला होता. हे पोटविभाग पाहून गांवकरी मंडळीस फारच आनंद वाटला.

"इनामदारसाहेब, इतकं पाणी निचरा करण्याची तुम्ही काय व्यवस्था केली आहे ?" डॉक्टर कत्तलखान यांनी विचारलें.

बाळासाहेबांनी त्यांस सांडपाण्याकरितां केलेला मलनाशक हौद (सेप्टिक टॅक) दाखविला. हौदांतलें विमल झालेलें पाणी एका ओढ्यांत सोडून दिलें होतें.

दुसऱ्या दिवसापासून रस्त्यांत, नदीकांठी किंवा निवाऱ्याच्या जागीं प्रातर्विधीस बसण्याची मनाई करण्यांत आली. प्रथम प्रथम "बगीच्यांत" जाणाऱ्या मारवाडी लोकांस बंद जागीं बसणें अवघड वाटलें; पण त्यांनाहि लांब जाण्याचे श्रम टळलेले पाहून बरें वाटूं लागलें. गाईचें दूध जास्त निर्मळ येऊं लागलें. गांवच्या कुत्र्याच्या तोंडांस घाण येईनाशी झाली आणि गांवचें आरोग्य पुष्कळच सुधारलें. ही झाली

नंतरची हकीकत; पण उद्‌घाटनाच्या दिवशी आणखी काय झालें तें सांगायचें राहिलेंच.

मंदिर पाहून झाल्यावर सर्व अंमलदार खूष झाले. ही योजना इनामदारांना आपणच सुचवली होती, असें त्यांनी आपापल्या डायऱ्यांत लिहून ठेवलें. सारवाडींत न राहण्याचें कारण अंबूताईस उरलें नसल्यानें त्यांचा चांगला आठ दिवसांचा मुक्काम तेथें झाला. त्या जेव्हां मुंबईस परत जावयास निघाल्या तेव्हां बाळासाहेब स्वतः त्यांना मुंबईपर्यंत पोंचवावयास गेले. मंदिराचा उद्‌घाटन-समारंभ एखाद्या बड्या अंमलदाराच्या हातून न करितां एका शाळामास्तरणीच्या हातून कां करविला ह्याचें बापू महारास कोडें पडलें होतें.

शास्त्रीबोवा त्याला म्हणाले, "बेट्या, तुला महाराला काय समजणार ब्राह्मणांचीं रहस्यं ? हें आरोग्यमातेचं मंदिर गांवकऱ्यांच्या उपयोगीं पडतं आहे खरं, पण तें गांवकऱ्यांच्यासाठीं का बांधलं आहे ? त्या मास्तरणीलाच खूष करण्याकरितां तें तयार झालं आहे. कांहीं दिवसांनीं ती गांवची इनामदारीण देखील व्हायचा संभव आहे. कांहीं असलं तरी हें नमुनेदार मंदिर आपल्या गांवाला लाभलं आहे तिच्यामुळं. आणखी मला वाटतं, शंभर हजार दगडाच्या मूर्ती करून त्यांचे सोहळे करण्यांत पैसा घालवण्यापेक्षां असल्या प्रकारची आरोग्यमाता किंवा विद्यादेवी यांचीं देवळं बांधणं हेंच अधिक पुण्यकारक आहे."

# शेटजींचें दुसरें लग्न : : ४

चंदूलाल शेटजीचें मी नेहमीचें गिऱ्हाईक होतों. कापड, खाऊ, खेळणीं, औषधें इत्यादि जिन्नस त्यांच्या दुकानी मिळत. दुकानांतूनच घरांत जाण्यायेण्याची वाट असल्यामुळें शेटजीच्या मुलाबाळांचीं बरीच वर्दळ दुकानांत होत असे; अर्थात् गिऱ्हाइकांची आणि शेटजीच्या कुटुंबीयांची थोडीबहुत घसट व्हायचीच. शेटजींना एक वीस वर्षांचा मुलगा होता, तो कॉलेजांत असे व मधूनमधून दुकानावर बसे. त्याच्याहून लहान मुलगेमुली पण होत्या व सर्व जण नेहमीच्या गिऱ्हाइकांशीं खेळीमेळीनें वागत असत.

या कारणानें शेटजींच्या दुकानांत दहा मिनिटें टेकून गप्पागोष्टी करून एखादा जरूर नसलेला जिन्नसहि घेऊन जाण्याकडे गिऱ्हाइकांची प्रवृत्ति होई. शेटजींची वाणी मोठी गोड होती. त्यांचें एक गिऱ्हाईक बाबूराव म्हणायचे , 'शेटजी, तुमच्या बोलण्यांत जी गोडी आहे तिच्या पावपट जरी तुमच्याकडे मिळणाऱ्या पदार्थांत असती तरी काय बहार झाली असती ? ' मी शेटजींच्या दुकानीं नियमानें जात असें. एकदोन जिनसा विकत घ्याव्या, दहा मिनिटें महायुद्ध, काळा बाजार, अन्नपरिस्थिति

इत्यादि विषयांवर गप्पा माराव्या आणि मग घराकडे जावें असा आठव-ड्यांतील एखाद्या तरी दिवसाचा माझा कार्यक्रम असे.

आज दुकानावर शेटजी नव्हते. त्यांचा मोठा मुलगा हिरालाल विक्री करीत होता. मीं विचारलें, 'काय हिरालालभाई, आज शेटजी नाहींत बसले दुकानावर ? '

'बापा गेले आहेत यात्रेला. पालिताणा, अबू, उज्जैन करून येणार आहेत परत–' हिरालाल म्हणाला.

'शेटजीचा पाय घरांतून निघाला एकंदरीत. एकटेच गेले आहेत, कां शेटाणीबाईना घेऊन गेले आहेत ! ' मीं विचारलें.

' बा ( आई ) पण त्यांच्या संगांत गेली आहे. तिची तबियत चांगली नव्हती, पण अशी तक पुन्हां कोठली यायला ! बापा यात्रेचे पैसे खर्चायला तैयार झाले आहेत ही मोठी पर्वणी, ती घालवूं नाहीं असा विचार करून ती पण निघाली. " हिरालालनें सांगितलें.

आणखी चारपांच दिवसांनी दुकानावर खरेदी करण्यास मी गेलों. पण दुकान बंद दिसलें. घरांत शिरून तपास केला. शेटजींच्या मोठ्या मुलीनें रडत रडत आपल्या आईच्या निधनाची बातमी सांगितली. यात्रेला जाण्याच्या आधीं आजारीच होती ती, दगदगीनें आजार वाढला असेल आणि शेवटीं बिचारी देवलोकाला गेली संसार अर्धवट टाकून !

आणखी आठ दिवस लोटले. दुकान उघडलें होतें आणि गल्ल्यावर चंदूलालशेटजी स्वतः बसलेले होते. कांहीं पदार्थ खरेदी करून इक-डल्या-तिकडल्या गप्पा मारीत होतों, तेवढ्यांत एक चौदापंधरा वर्षांची देखणी मुलगी डोक्यावरला पदर सांवरीत शेटजींच्या मुलीबरोबर रस्त्या-वरून येऊन घरांत शिरली. कांहीं वेळानें ती पुनः बाहेर गेली. शेट-जींच्या घरांत पूर्वी मीं तिला पाहिलें नव्हतें. हिरालाल जवळच काम

करीत होता त्याची थट्टा करावी म्हणून मी शेटजीना म्हटलें, “ शेटजी, सून पाहून ठेवलीत वाटतं ? शेटाणीच्या नंतर घरांत बायकोमाणूस पाहिजे खरंच ! ”

“ हो. बरोबर बोललेत साहेब. ‘ग्रहं तु ग्रहणीहीनं’ ... ” शेटजी मध्यभारतीय संस्कृतांत म्हणाले.

‘पण ही बापांची सून नाहीं बरं का साहेब, ही आमची नवी आई आहे !’ हिरालालनें फडक्यानें एक अलमारी झटकीत फणकाऱ्यानें मला सांगितलें.

मी चकित झालों. बरोबरीचा मुलगा व दुसरी तीन मोठी मुलें आहेत. पन्नासच्या सुमाराचे वय झालें आहे आणि हा गृहस्थ सहज यात्रेला जातो काय आणि पोरसवदा बायको करून येतो काय ? पेशवाईच पुन: अवतरली असा मला भास झाला.

‘हिरालाल माझ्यावर लई गरम झाला आहे, मीं ही बायडी करून आणली म्हणून. पण माझी सगळी हकीकत ऐकून घ्या न् मला सांगा यामंद' काय भूल झाली असल तर. चूक असली तर पायांतला काढून माझ्या गालफडावर दहा वेळ मारा.’ शेटजी सांगूं लागले. मधून दोन-तीन वेळां गिऱ्हाइकें आलीं, त्यांच्याशीं ते कामापुरते बोलले व पुन्हां त्यांनी हकीकतीचें सूत्र चालूं ठेविलें.

‘हें पहा साहेब, आमच्या जैन लोकांनी एक पार्टी काढली. इथून पालिताणा, तिथून अबू करून तारंगा हिल् न् मग परत. दहा दहा रुपयांच्या रिटर्न तिकिटा काढल्या होत्या. मी दोन तिकिटा घेतल्या. एक स्वतःकरतां न् दुसरी घराकरतां. आम्ही इथून निघून पालिताण्याला पोंचलों. ऋषभनाथ धर्मशाळेंत उतरलों. संध्याकाळची वेळ. बायका मंडळी डाळभात तयार करीत होती, आम्ही पुरुष मंडळी अमेरिकन् फीचरच्या तारांची वाट पाहत गप्पा मारीत होतों. तेव्हां अहमदाबादच्या

अंबालाल शाहाची बायको माझी आतेबहीण लागते ती, ती मला सांगूं लागली, 'बेनला फार ताप आला आहे.' मी हात लावून बघला, जसा जळता अंगार ! आमच्याबरोबर डॉक्टर श्रॉफ होता. इंजक्शन दिलं त्यानं. लागलीच तिला बिछान्यावर निजवून ठेवली, खाणं बंद केलं. सगळं बरोबर केलं. स्टेटचा दरबार डॉक्टर बोलावला दहा रुपये फी देऊन; पण तिचा न्यूमोनिया बिगडत चालला न् आम्हीं पोंहचलों त्याच्या चौथ्या दिवशी ती देवलोकाला गेली !' शेटजी डोळे पुसूं लागले.

"पंचवीस वरीस संसार बरोबरीनं केला नि यात्रेच्या पवित्र ठिकाणांत आम्हांला सोडून चालती झाली. पुण्यात्मा खरीच ! शेवटीं शुद्धींतही नव्हती बिचारी । चार पोरं पोटी येऊन शेवटी पाणी पाजायला एकयू नाहीं जवळ ! मीच पाणी दिलं शेवटलं. अखेरचा संस्कार करून शोक करीत होतों. अंबालाल म्हणाला, 'भाई चंदुलाल, शोक करून बेहेनच्या अंतरात्म्याला कष्ट देऊं नको. हा पहा गरीब वाणिया मोतीलाल, यान कसे दिवस काढावे ? त्याची बायको मरून गेली नि एक चौदा वरसाची छोकरी आहे त्याला. बिचाऱ्याला मुलगी देतो कोण ? पण भाई, छोकरीच्या लग्नाच्या काळजींत आहे तो.'

'मी काय करूं त्याला ? ' मीं विचारलं. 'माझं दुःख माझ्या शिरावर आहे, दुसऱ्याचा भार घ्यायला तें खालीं नाहीं.' अंबालाल म्हणाला, 'भाई, जें शिर दुसऱ्याचा भार सहन करतं त्याला स्वतःच भार वहावा लागत नाहीं. तूं मोतीभाईच्या छोकरीशीं लग्न कर.' मी चमकलों 'अरे, तूं वेडा तर नाहींस ! पन्नास वर्षांच्या म्हाताऱ्याला ह्या कोवळ्या कळीशीं लग्न लावायला सांगतो आहेस तो ?' अंबालाल म्हणाला, वाणियाच्या बच्च्या , विचार कर. मिसेस् चंदुलाल शाहाच्या नांवाचीं

रिटर्न तिकिट फुकट जाती आहे. बी. बी. रेल्वेच्या बापाचं तूं कांहीं खाल्लं नाहीस त्याला फुकट पैशे द्यायला.'

अंबालालनं माझ्या डोळ्यांत अंजन घातलं. मी तसाच घरीं परत येईन तर तिच्या नांवची तिकीट फुकट गेली असती. नॉटट्रॅन्सफरेबल (दुसऱ्याला चालत नाही ) आणखी नो रिफंड (पैसे परत नाही) असं त्या तिकिटीवर ठळक अक्षरांनी छापलं होतं. मोतीभाईच्या छोकरीला मिसेस् चंदुलाल शाह बनवल्याशिवाय गत्यंतर नव्हतं साहेब. चार मंडळी जमलीच होती, तीर्थाचं ठिकाण होतं. साधं लग्न केलं. पांच रुपयांत लग्न केलं बघा साहेब अन् दहा रुपयांचीं रिटर्न तिकिटं बचावलीं ! आतां हीं मूर्ख पोरं, 'बाप्पा लग्न कशाला केलंत हो ? ' असं विचारतायत्. त्याला कितीदां सांगितलं खरं कारण, पण पटत नाहीं तें मूर्खांनूला ! "

एक बडें गिऱ्हाईक दुकानांत शिरलें आणि शेटजी त्याच्या तैनातीला लागले. रागानें लाल चेहरा झालेल्या हिरालालचा हात सहानुभूतीनें दाबून खरेदी केलेले पदार्थ पिशवींत कोंबून मीं दुकान सोडलें.

## निष्फळ क्लेश : : : ५

लहानग्या भालचंद्राचे आईबाप त्याला पोरका टाकून दोन दिवसांच्या अंतरानें पृथ्वीवरील बिऱ्हाड सोडून कायमच्या निवासस्थानीं रहावयास गेले होते. भालचंद्राच्या देहाचा, त्याच्या आईच्या किडूकमिडुकाचा आणि बापाच्या अल्पस्वल्प मालमत्तेचा ताबा त्यच्या चुलताचुलतींनीं घेतला. कांहीं दिवसांनीं चुलतीचुलतींस त्याचा कंटाळा येऊं लागला. एके दिवशीं जेवणाचे वेळी भालचंद्र पतंग उडवीत गच्चीवर खेळत असतां वरच्यावर कोंडून ठेवण्याकरितां त्याच्या चुलतभावंडांनीं खालीं येण्याचें दार बंद करून टाकिलें.

थोड्या वेळानें गच्ची तापली. त्याचे पाय पोळूं लागले व तो खालीं येण्यास निघाला. परंतु दार बंद असल्यानें वरच हांका मारीत व दाराला धक्के मारीत तो राहिला. 'खेळूं द्या मेल्याला पोटभर' असें त्याची काकी ओरडली. बिचाऱ्या भालचंद्रानें पाय पोळूं नयेत म्हणून अंगा-तला सद्रा काढून पायांखालीं धरला. परंतु तेवढ्यानें कितपत बचाव होणार! गडबड लोळावें तर सगळेंच अंग भाजावयाचें! अशी त्याची केविलवाणी स्थिति झाली.

भालचंद्रावर माया करणारें एकच माणूस जगांत होतें. तें म्हणजे सीता मोलकरीण. ती दार उघडण्यास जाऊं लागली तेव्हां काकान तिला जाऊं दिले नाही. परंतु पोराचें दीनवाणें ओरडणें ऐकून तिला इतका कळवळा आला की, तिनें आपला मुलगा पांडू याला शेजारच्या कौलारावर चढून भालचंद्राची सुटका करण्यास सांगितलें.

गच्चीवरून रडण्याचा आवाज एकाएकी थांबलेला ध्यानांत येतांच काकीनें, "अगबाई, कारटं घेरी येऊन पडलं तर नाही ?" असें म्हणून गच्चीवर येऊन पाहिले. गच्चीवर पाऊल टाकतांच तिच्या पायास टरटरून फोडच आले. तिला वाटलें त्यानें खाली उडी घेतली असावी. नंतर खालीं येऊन पाहतें तों दोनचार बाया भालचंद्राच्या पायास तेलबील चोळीत आहेत व त्यास उगा करीत आहेत असें दिसले. "काय बाई कारटं अघोरी आहे ! वरनं खालीं उडी घेतलीन् वाटतं ! ह्या पोरक्या पोरांना आपल्या पोरांचा घांस तोडून गिळायला घालावं तर ती असलं अपेश द्यायचीं ! धर्म करतां कर्म उभं राहायचं !"

" काय तरी काकी बोलतां हे ? भाल्लूच्या मिळकतातूनच स्वतांचा संसार चालवतां अन् उलट त्यालाच वाटल तसं बोलतां ? एक घंटा झाला. गच्ची तापल्या तव्यावाणी भाजून गेली आहे. तिथें माझ्या भाल्लूला तापल्या तव्याची शिक्‌सा द्यायला तुमच्यांत कैकया आली असली पाहिजे." सीता चवताळली.

"ज्यानं त्यानं आपली पायरी संभाळून बोलावं ! चल भाल्या जेवायला, मी खालींच तुला सोधीत होतें. गच्चीवर तूं आहेस हें मला माहीत पण नव्हतं. " काकी म्हणाली.

"आई, आम्हीं नाहीं का तुला सांगितलं, भाल्लूला गच्चीवर कोंडलं आहे –अन् तूंच नाहीं का म्हणालास 'राहूं दे कार्ट्याला, पाय भाजले म्हणजे कथ्थक नाच कसा करतो'— "

"गप्प बस गंगे, कोणाला खरंच वाटायचं!" काकी मुलीला दाबीत म्हणाल्या, "भाल्रू, चल बाळ, मम् मम् करायला."

तथापि भालूनें सीतास इतकें घट्ट धरलें होतें कीं, काकीनें त्या वेळ-पुरता तरी त्याचा नाद सोडला. सीतानें त्यास आपल्या घरीं नेऊन जेवूं घातलें व निजविलें. त्यानें काकीची इतकी हाय खाल्ली कीं, काकीच्या घरांत आणतांच तो थरथरां कापूं लागे; म्हणून सीतानेंच त्यास आपल्याकडे ठेविलें.

वरील प्रकार झाला त्या वेळी भालचंद्र पांच-सहा वर्षांचा होता. पुढें त्याचे शाळेंतील शिकणें सीताच्या खर्चानेंच पार पडलें. शिवाय शिकवण्या, छात्रवृत्ति व मदत यांच्यायोगें कॉलेज्पर्यंत त्याची मजल गेली असतां सीताबाईच्या डोळ्यांस मोतीबिन्दु येऊन ती आंधळी झाली.

भालचंद्र एक ज्ञातिफंडाची जाडशी छात्रवृत्ति मिळवून मुंबईस वैद्यकीय अभ्यासक्रम पार पाडण्यासाठीं गेला. आपल्या पालनकर्त्या आईच्या पंगु होत चाललेल्या स्थितीमुळेंच त्याला वैद्यकीय अभ्यासक्रम आवडूं लागला. सुट्टींत जेव्हां जेव्हां तो घरी येई तेव्हां तेव्हां सीताबाई त्यास म्हणे, 'भालू माझे डोळे बरे होण्याचा उपाय तूं केलास तरच डागदरीची विद्या शिकायचा उपयोग झाला असं मी समजेन."

तिचा पाल्य हंसून आश्वासन देई, "आई, तुझ्या डोळ्याकारितांच मीं डॉक्टरीचा कोर्स घेतला आहे. तुला चांगलं दिसूं लागेपर्यंत मी डोळ्यांच्या रोगांवर सारखे प्रयोग करीत राहीन."

"अरे, पण तू गेल्याच वरसां मला मुंबईला नेलं होतंस तेव्हां 'माझे डोळे परत येणें सक्य नाहीं' असं नाहीं का मुंबईच्या सगळ्या डागद-रांनीं सांगितलं ?" सीताबाई अंमळ दुःखी स्वरांत म्हणाली.

"तें कांहीं असलं तरी हा पठ्या तुझी दृष्टि तुला परत मिळवून देणार." भालचंद्र निश्चयानें बोलला.

शेवटल्या परीक्षेंत वर क्रमांक मिळवून, ज्ञातिफंडाची आणि सरकारी मदत मिळवून नेत्रवैद्यकाच्या विशेष अभ्यासासाठीं भालचंद्रानें जर्मनीस प्रयाण केलें. तेथें विशेषेंकरून सीताबाईस झालेल्या सव्रण मोतिबिन्दूचाच त्यानें विशेष अभ्यास चालविलेला होता. त्या रोगावर विशिष्ठ शस्त्रक्रिया आणि अतःक्षेपणद्रव शोधून काढून त्यानें पंचरावीस पराकोटीस गेलेले रोगी बरे केले. आतां त्याला आत्मविश्वास वाटूं लागला कीं, सीताबाईचे डोळे आपण खात्रीनें बेर करूं त्याच्या शोधामुळें त्यास उच्च पदवी मिळाली आणि विद्यापीठाच्या चालकांनीं "हिंदुस्थान देशास डॉक्टर भालचंद्र यांच्या शोधानें आन्तरराष्ट्रीय महत्त्व निदान वैद्यकशास्त्रापुरतें येणार आहे" असें उद्गार काढिले. हे उद्गार ऐकत असतां त्याच्या डोळ्यांपुढें, आपण सीताबाईचे डोळे बरे केले आहेत, ती आपल्याकडे कौतुकानें पाहत आहे आणि आपल्यावरून बोटें मोडून ओवाळून टाकीत आहे व "भाल्ह, आज तू माझे पांग फेडलेस," असें म्हणत आहे असा देखावा दिसत होता.

'तो स्वदेशीं येण्यास परत निघाला असतां त्यास पांडूचें पत्र मिळालें. आई फार आजारी आहे व तिनें तुझ्या परत येण्याचा ध्यास घेतला आहे.' असा त्या पत्रांत मजकूर होता. बारा दिवसांनी मुम्बईस धक्क्यावर पाय ठेवतांच पांडूनें त्यास मिठी मारून रडत रडत आई दोनच दिवसांपूर्वी आपल्याला सोडून गेल्याची बातमी सांगितली.

दुपारीं सामान सोडतां सोडतां एका ट्रंकेंतून त्याचे अभ्यासक्रमाचे कागद आणि त्यानें शोधिलेल्या औषधाच्या कुप्या निघाल्या. स्वतःला मिळालेल्या पदवीपत्राचे त्यानें शांतपणें तुकडे तुकडे केले. नंतर आपल्या

शोधांच्या निबंधाची तशीच विल्हेवाट लावून त्यानें अन्तःक्षेपणद्रवाच्या कुप्या जमिनीवर आपटून पायाखाली तुडवून टाकिल्या. सीताबाईच्या दृष्टिहीन असहाय स्थितींतल्या, समोर भिंतीस टांगलेल्या छायाचित्राकडे सबाष्प नेत्रांनीं पाहत तो म्हणाला, "आई, तुझ्याकरतां इतका खटाटोप मीं केला; आतां या निष्फळ वैज्ञानिक प्रयोगाचा मला काय उपयोग आहे ?"

## पेटींतील गौप्य* : : : ६

झकपकाबाद हें पूर्वी मोठें शहर होते. तें एका रंगेल नबाबाचें राजधानी शहर असून हल्लीं फक्त एक हजार वस्तीचें खेडे मात्र राहिलें आहे. या ठिकाणचे लोक रंगेलपणाबद्दल फार प्रख्यात आहेत, याची साक्ष तेथील दोन तांबोळ्यांचीं दुकानें, दारूचा गुत्ता, जरतारी कामाचें दुकान व दोनतीन शिंप्यांची दुकानेंच देतील. निषेधपक्षीं साक्ष हवी असल्यास शुक्रवारीं ही रिकामी असणारी मशीद देखील खिन्न व शून्य मुद्रेनें देईल. गांवचे कोतवालसाहेब हाजी सुलेमान साहेब हेहि मोठे चैनी असत व त्यांनीं आपली कन्या फतिमा हिलाहि स्वच्छंदपणानें वागण्यास परवानगी दिली होती. फतिमा हिचें हल्ली बरेंच वय झाल्यानें तिची शादी कोणा-बरोबर होते तें पाहण्याकडे सर्वांचे डोळे लागले होते. गांवांतील तरुण तर 'तुला हीं वरणार. कोतवालसाहेबांची तुझ्यावर मर्जी आहे. तर तूंच त्यांचा जांवई होशील,' अशा तऱ्हेनें एकमेकांची अंतर्यामीं, लोकांनीं आपणास याच शब्दांचा अनुवाद करावा या इच्छेनें, थट्टा करण्यास सुरवात केली होती.

---

* सन १९१२ तली ही गोष्ट आहे.

आज तर ती नवीन सुंदर ओढणी नेसून हातांत गुलाबाचीं फुलें घेऊन शेताकडून घराकडे जात होती. त्या वेळी अहमद व महमद या दोघां तरुणांनीं तिला पाहिलें. दोघांचेंहि तिजकडे लक्ष्य वेधलें; दोघेहि दुसऱ्याच्या आंबराईत दगड मारून आंबे पाडीत होते. पण हातांतील दगड तसेच टाकून तिच्यापुढें गेले व नम्रपणें तिजपुढें वांकून त्यांनीं सलाम केले. अजून एकहि कैरी न पाडल्यानें तिला नजराणा देण्यास जवळ कांही नाही म्हणून त्यांस वाईट वाटलें. ती तशीच त्यांजकडे तिरस्कारपूर्वक पाहून चालती झाली. अहमद व महमद एकमेकांकडे पाहून स्मित करूं लागले. अहमदानें सारखी तिजकडे नजर लावली.

"कायरे बघतोस येवढी टक लावून?" महमदानें विचारलें.

"आ—काही नाही. खरंच, आज दुपारीं मला पत्ते खेळायला येतां येणार नाही. काकूला भेटायला जायचं आहे फत्तेपुरास."

"बरं बोललास. मला आज दुपारीं निजायचं आहे. रात्रीं किटीजानच्या गाण्याला गेलों होतों, त्यामुळें जागरण झालं आहे."

"बरं झालं. कटकट मिटली." दोघेहि मनांत म्हणाले व जमिनीवरून पुनः आंबे काढण्यास दगड उचलणार तों माळ्याची ओरड ऐकून दोघे दोन दिशांनीं पसार झाले.

अहमद व महमद दोघेहि मोठे निष्काळजी व होतकरू तरुण होते. एकाचा बाप वाण्याचा धंदा करी व दुसरा सुतारकाम करून आठ आणे रोज मिळवी. दोघे जिवलग मित्र असून फार फॅशनेबल असत. नानातऱ्हेचे नेकटाइज, टोप्या, बटनें व छड्या वारंवार खरेदी करून सर्व गांवाचें लक्ष्य आपणाकडे ते वेधीत. अहमद तर बापाच्या दुकानांतील रद्दीवरच्या बातम्या वाचून दाखवून सर्व गांवास ज्ञानदान करीत असे. महमद लांकडाच्या बारीकसारीक वस्तू लोकांस नजर करून त्यांची

मर्जी संपादन करी. असे ते दोघे खुशालचेंडू दुपारच्या वेळीं एकमेकांस चकवून एकाच वेळी दुपारी फतिमेच्या घराशी गेले.

अहमद दांतओठ खाऊन म्हणतो ; "वाहवारे दोस्त, खूप आहे बुवा तुझी दुपारची झोंप ? "

महमद रागावून त्रासिक मुद्रेनें म्हणाला, " अन् तुमचंहि फत्तेपूर आज कोतवालसाहेबांच्या दाराशी आलं आहे वाटतं ? "

" मीं तुला नुस्ती थाप दिली रे—मला वाटलंच होतं आज आपली स्वारी इकडे फिरणार म्हणून ! "

" बरं-बरं-कांही चोरी आहे का इकडे येण्याची ! "

" चोरी नाहीं म्हणा पण मी आधी इथें आलों आहें, तेव्हां मीच दार ठोठावणार; तूं हो मागें."

" चल, चल ! म्हणे मागें हो; तुझ्या बापानंच रस्ता खरेदी केला असेल मी मागें व्हायला. "

अशा तऱ्हेनें त्यांची बरीच बोलाचाल होऊन शेवटी मारामारी झाली. तींत महमदानें त्या वाण्याच्या पोरास मागें खेंचलें व आपण दाराशीं जाऊन दार ठोठावूं लागला. अहमद मारामारीत पडलेल्या आपल्या टोपीवरील धूळ झाडीत मागें उभा राहिला. इतक्यांत फतिमेनें दार उघडलें. महमदानें विजयी मुद्रेनें सलाम आलेकम् केला. अहमद हळूंच टोपी चढवीत चढवीत उसनें अवसान आणून 'सलाम' म्हणाला. हा प्रकार पाहून फतिमा आश्चर्यचकित होऊन दोघांकडे पाहतच उभी राहिली.

" कां ? आंत यायची परवानगी देतां का ? " महमद म्हणाला.

" बंदा आपणाला बाहेर येण्याची विनंति करीत आहे." अहमद बोलला.

" छे छे ! आतां मला बाहेर येतां येत नाहीं, घरीं काम आहे." असें

फतिमेने दिलेलें उत्तर ऐकून महमदाला फार आनंद झाला. तथापि अहमद निराश न होतां पुनः म्हणाला, "आईनं आपल्या स्वारीला फराळाला बोलावलं आहे." तरी दुपारी कोठूनसा पुरवा झोडून आल्यामुळें तिला फराळाला जावेंसे न वाटल्यानें ती म्हणाली, "त्यांना सांगा 'आज दुपारी मी जेवायला गेल्यें होत्यें, पोट फार भरलं आहे. तर आतां कांही जायचं नाही. माफ करा ' म्हणून." हे शब्द ऐकतांच महमदास मोठा हर्ष झाला व 'आतां कशी जिरली' असे उद्गार दर्शविणाऱ्या नजरेनें डोळे मिचकावून त्याने आपल्या प्रतिस्पर्ध्याकडे पाहिलें. नंतर त्यानें 'चला जरा आंत गोष्टी बोलायला.' असें म्हटलें. तेव्हां फतिमा त्यांस आंत घेऊन गेली. जातां जातां अहमद महमदास म्हणाला, "कायरे तुला झोंप येत असेल ना ? घरी जा की." महमद त्याला म्हणाला, "अन् तूं आपल्या आईला निरोप सांग कीं, फतिमाबीचा ! "

इतक्यांत कोतवालसाहेब त्या जागीं आले. या दोन तरुणांवर त्यांची मोठी बहाल मर्जी असल्यामुळें यांपैकीं एकास जांवई करून घ्यावें असें त्यांस वाटे. त्यांनी त्याच वेळीं त्यास सांगितलें, "मुलांनो, या सर्व झकपकाबाद शहरांत तुम्हीच काय ते माझ्या इभ्रतीला साजेलशा थोर कुळांतले पुत्र आहां. तुम्हां दोघांपैकीं ज्यास माझी मुलगी निवडून पसंत करील तो माझा जांवई होईल." हे शब्द ऐकतांच दोघांनींहि हर्षभरित होऊन आपल्या इच्छित श्वशुरास लवून सलाम केला.

झालें; त्या दिवशी संध्याकाळीच गांवभर ज्याच्या त्याच्या तोंडीं फतिमेच्या शादीच्याच गोष्टी निघूं लागल्या: अहमद हा वाण्याचा मुलगा घरचा जास्त बरा होता, तथापि महमद जास्त देखणा असल्यानें दोघांपैकीं कोणास फतिमा मिळते, हा मोठाच प्रश्न होता. फतिमा धूर्तपणें दोघांवरहि सारखीच मर्जी दाखवीत असल्यानें लोक अधिकच बुचकळ्यांत पडत. अशा तऱ्हेनें दोनचार दिवस गेले.

पांचव्या दिवशी महमदास एका घरवाल्यानें रुपया रोजीवर कामास लावलें. लगेच त्यानें संध्याकाळी माळ्याकडून दोन पैशांचा फुलांचा झुबका विकत घेतला, व फतिमेस नजर केला. सकाळींच अहमदाकडून एक सुदर हारगजऱ्याची भेट तिला पाठविण्यांत आली.

सहाव्या दिवशीं महमदानें न्हाव्यास कायमची रजा दिली. सुमारें पंधरा दिवसांनीं त्यानें हेअर कटिंग करून घेतलें; अहमदहि केसांस तेल चोपडून भांग काढून हिंडूं लागला.

सातव्या दिवशीं महमदानें जमनाप्रसादाचें तट्टूं मागून घेतलें व दुपारी दिल्लीस जाऊन आला. येतांना त्यानें नवीन जरीची टोपी, जरीचे चढाव व लांब झिरझिरीत सद्रा इतक्या नवीन वस्तू खरेदी करून आणल्या. अहमदानें आठव्या दिवशीं गंगाप्रसादाची ट्रायसिकल घेतली व दिल्लीहून एक हॅट, डायमंड लेदरचे लेडी फॅशन स्लिपर्स; पट्ट्यापट्ट्याचे पायमोजे, झिरझिरीत सद्रा व त्याच्या आंतून दृश्यमान होणारें गुलाबी जाकीट इतक्या वस्तू खरेदी करून आणल्या.

आणखी तीन दिवसांनीं महमदानें जरतारी जाकीट, त्याच्या वरच्या खिशांत ठेवण्याकरितां हिरवा रुमाल व एक घड्याळाचा (शेडा त्याच्या दुसऱ्या टोंकाशी काय बांधलें होतें कोण जाणें ! ) इतक्या वस्तु आणल्या. या वेळीं तो दिल्लीस गेला नव्हता, तरी गांवांतूनच पैदा केलेल्या या जिनसा असाव्या. लगेच अहमदानें एक पाठीवर तीन घड्या पाडलेला शॉर्ट कोट व एक रिस्ट वॉच ही खरेदी करून आणली.

नंतर महमदानें एका जत्रेंतून एक कॉलर विकत आणली. अहमदानें दुसऱ्या दिवशी एक हिरवे व तांबडे पट्टे असलेली सेल्युलॉइडची चकचकीत कॉलर, एक बो, एक नेकटाय व एक नकली हिऱ्याची गुंडी इतक्या जिनसा आणल्या.

महमदाला एक सिगारेटची डबी सांपडली. ती तो नेहमीं बरोबर घेई व विड्यांभोंवताली पांढरे कागद गुंडाळून त्या तो ओढूं लागला. हें पाहून अहमदानें एक भला जाड चिरूट ओढीत जाण्यास सुरुवात केली.

अशा तऱ्हेनें लोकांनीं या दोघांचा सामना पाहून त्यांस 'पोषाखाच्या बाबीत सामना सोडून द्या, शौर्य दाखवून बक्षीस जिंका' असें सांगितलें. शिवाय अहमदाच्या बापाचें मुलाच्या खर्चानें डोकें शेकत चाललें होतें. त्यानें मुलास तो अवाढव्य खर्च बंद करण्यास सांगितलें; शिवाय महमदाला "माझ्या घरांतल्या वस्तु हलके हलके तुला विभूषित करूं लागल्या आहेत, त्यांचा योग्य वेळी बंदोबस्त कर.' अशी त्याच्या मालकानें ताकीद केली. तेव्हां त्यांनीं आपसांत तह करून पोषाखांतील चढाओढ बंद केली. यानंतर 'फतिमेस एकाद्या संकटांतून सोडवावें, सोडवील त्यानें तिजवर हक्क सांगावा,' असें ठरलें.

मध्यतरी अहमद एक नाटक पाहून आला. त्या नाटकांतील नायक विरहदुःखानें विरक्त झालेला होता, त्याप्रमाणें आपण वागावें म्हणून त्यानें लगेंच सर्व झकपक् पोषाक टाकून दिला व अगदीं साधा पोषाख घालण्यास सुरवात केली. मधून मधून आकाशाकडे पाहून दीर्घ सुस्कारे टाकणें, केंस मोकळे सोडणें, शून्यदृष्टीनें व जड पावलांनीं चालणें या गोष्टी त्याने सुरू केल्या. लगेच महमदहि सद्रा व विजार यांशिवाय वस्त्र घेईनासा झाला. एका हातांत कांद्याचें पाणी दिलेला हातरुमाल मात्र ठेवी. या रुमालानें तो वारंवार डोळ्यांस पाणी आणी व पुशी. दुसऱ्या हातांत एक कुठल्या तरी बागेंतून चोरून आणलेलें गुलाबाचें फूल असे व मधून मधून प्रेममय गुलाब पुष्प व बुलबुल पक्षी यांवर व पऱ्यांवर केलेलीं गाणीं म्हणत जाऊं लागला. लगेच अहमद फतिमेचें एक चित्र, हातरुमाल, गुलाबाचें फूल या जिनसा जवळ ठेवून शिवाय एका बुलबुल पक्ष्याचा

पिंजरा हातांत घेऊन व बुलबुल पक्ष्याशीं नानातऱ्हेचे प्रेमसंवाद करीत जाऊं लागला. कोणताहि पदार्थ नजरेस पडला तरी त्याला प्यारी फतिमेची आठवण होऊं लागली. अबदुल गवळ्याचा रेडा डुलत डुलत जाई तेव्हां त्यास फतिमेच्या गजगतीची आठवण होई, व जर तो रस्त्यानें धांवत चालला तर त्यास वाटे, फतिमेनें याची गजगति चोरल्यानेंच हा अशा द्रुतगतीनें चालला आहे की काय? बाजारांतील बटाटे पाहून त्यास फतिमेच्या ठळक डोळ्यांची, दुकानांत टांगलेली गंगावनें पाहून तिच्या केंसांची, बांबूचे भारे पाहून तिच्या सुंदर व कृश हातापायांची त्यास आठवण होऊन त्याचा कलिजा व्यथित होऊं लागला. "हाय! हे बुलबुल पक्ष्या, इस्तंबूलच्या अत्तरांहून जिच्या श्वासाचा सुगंध अधिक दरवळत आहे, जी सावकाश चालतांना दिल्लीच्या बादशहांच्या हत्तीस व भराभर चालतांना मक्केच्या लांबटांग्या उंटास लाजविते, जिचें सौंदर्य पाहून अस्मानच्या पऱ्या पंख मिटून घेऊन मत्सरानें जळफळत उभ्या राहतात त्या माझ्या हृदयाच्या देवतेची मला हालहवाल सांगशील काय? अथवा, तूं तरी कशाला सांगशील? कारण जिनें सुस्वर शब्दांत तुझी स्पर्धा केली, तिजविषयीं हकीकत तूं कसा सांगणार?" अशा तऱ्हेचीं कवनें म्हणत तो हिंडूं लागला.

पण या स्पर्धेचाहि कंटाळा येऊन त्यांनीं एक नवीन तोड काढली. फतिमा दररोज संध्याकाळीं ज्या रस्त्यानें शेतावरून घरीं येई, तेथील एका धनगरास सांगितलें कीं, 'अमुक दिवशीं ती या रस्त्यानें घरी जाऊं लागली कीं, तिच्या अंगावर तूं आपलें कुत्रें सोड. जो तिची सुटका करील त्यानें तिच्यावर आपला हक्क सांगावा.' त्याप्रमाणें एकदां अहमद व महमद दोघे रस्त्यावर दडून राहिले. धनगरानें ठरल्याप्रमाणें तेथून फतिमा जाऊं लागतांच तिच्या अंगावर कुत्रें सोडलें. अहमद घाबरल्यामुळें पुढें गेला नाहीं. महमद मात्र त्याच्यावर चाल करून गेला. लगेच

कुत्रें त्याच्यावर उलटलें व त्याचा सद्रा दातांत धरून भांडूं लागलें. महमद धांवूं लागला, पण कुत्र्यानें सद्रा सोडला नाहीं. अशा तऱ्हेनें सर्व गांवांत त्याची धिंड निघाली. इकडे कुत्रें गेलेलें पाहून अहमद फतिमेजवळ गेला व सलाम आलेकम् करून म्हणाला, " आपल्याला कांहीं लागलें नाहींना ? "

" आलेकम् सलाम् ! आपण इकडे कुणीकडे ? "

" इकडे असाच फिरायला जात होतों, पण आपल्यावर या जंगली जानवरानं केलेला हल्ला पाहून सुटका करण्याच्या इराद्यानें येथें बंदा प्राप्त झाला. पण या भ्याड महमदाने पहा—हाः हाः हाः ! काय यःकश्चित् कुत्र्याला भितो आहे ! मी असतों तर या काठीनं केव्हांच त्याचा प्राण घेतला असता."

"खरंच का गडे तुम्ही त्याचा प्राण घेतला असता !"

"हो—हो ! तुझ्यासारख्या परीकरितां हा गुलाम काय करणार नाही ! प्रत्यक्ष वाघाच्या जबड्यांत तोंड देण्याची पाळी आली, डागलेल्या तोफेच्या तोंडाशीं उभा राहून एखादी कामगिरी करण्याचा हुकूम झाला, तरी हा पठ्या डरणार नाही."

त्या दिवसाच्या प्रसंगानें फतिमेचें मन अहमदाविषयीं बरेंच अनुकूल झालें. दुधांत साखर पडण्याचें कारण असें झालें कीं, त्याचा बाप लौकरच मुलाला एक घर व दीडशें रुपये ठेवून परलोकवासी झाला. आतां महंमदाच्या आशेचें उन्मूलन झालें. सर्व गांवांत ही गोष्ट बहुतेक ठरल्यासारखी झाली. इतकेंच नाहीं तर त्यांच्या लग्नाच्या तिथीविषयीं देखील लोकांत बोलवा सुरू झाली. महमदानें निराशेनें सर्व थाटमाट सोडून दिला. दररोज रात्रीं अहमद व फतिमा यांचें जोडपें स्वप्नांत येऊन आपणास खिजवत आहे असें त्यास वाटूं लागलें.

अशा तऱ्हेनें एक महिना लोटला; पुढें एके दिवशीं तो एक जुनी

लांकडी पेटी घेऊन तिला लोखंडी पट्ट्या बसवून भक्कम कुलूप बसविण्याकरितां लोहाराकडे गेला. लोहारानें त्या पेटीचें कारण विचारतांच त्यानें गंभीर मुद्रेनें "छे छे ! कारणबिरण विचारूं नको; तें कोणाला सांगायचं नाहीं." असें म्हणाला.

दुसऱ्या दिवशी गांवभर पेटीविषयी लोकांत गप्पा सुरू झाल्या. सर्व गांव आश्चर्यचाकित झाला. 'या भिकाऱ्याला पेटी कशाला हवी' असें जो तो म्हणूं लागला. त्या दिवशी संध्याकाळी त्यानें ती पेटी आपल्या बिऱ्हाडी माघारी आणली व तासाभरानें जेव्हा ती बाहेर काढली तेव्हां ती बरीच जास्त जड झाली होती. तिला मोहरबंद करून कुलुपावर व इतर जागीही लाखेचीं सीलें बसविलीं होती. शिवाय त्याची गंभीर व आढ्य वर्तणूक त्या पेटीत कांही तरी मौल्यवान् पदार्थ असावेत असेंही दर्शवूं लागली. ती पेटी जरी फार जड होती, तरी तो ती दुसऱ्या कोणाची मदत न घेतां गांवांत नेऊं लागला. त्याच्या भोंवती बराच मोठा कौतुकानें प्रेरित झालेल्या लोकांचा घोळका जमला.

तो काजीसाहेबांच्या घराजवळून जाऊं लागला असतां ते खिडकींतून डोकें काढून गर्दी कसली आहे म्हणून पाहातात तोंच त्यांच्या दृष्टीस मोठ्या कष्टानें पेटीचें ओझें खांद्यावरून वाहणाऱ्या महमदमियाची स्वारी पडली. "बेटा महमद, काय, कसलं ओझं घेऊन चालला आहेस ?"

महमदानें बुबुळें वर नेऊन वरचा ओंठ दातांनीं चावून नकारार्थी मान हालविली व म्हटलें, "आहे कांहीं तरी गुपित."

"गुपित !" काजीसाहेब आतां विशेष जिज्ञासेनें दरवाजाबाहेर आले व म्हणाले; "गुपित—हाः हाः, आम्हांला कळूं द्या बुवा तुमचं गुपित !"

"छे छे ! गुपित म्हणजे गुपितच तें. योग्य वेळ आल्याशिवाय तें या कानाचं त्या कानाला देखील कळायचं नाहीं."

"म्हणजे ? कांही खूनबीन तर नाहीं ना केलास लेका ?" काजी-साहेब सभयाश्चर्यानें उद्गारले.

"छे छे ! भलतंच कांहीं तरी ! तशी काळजी करूं नका; पण तें फार जरूरीचं काम आहे. मी तुम्हांला सांगितलं असतं-पण-पण आतां नकोच तें."

"पण, कशापैकी आहे तें तरी सांगाल ?" घोळक्यापैकीं एकजण म्हणाला.

महमदानें त्या पेटींत काय आहे याचा थांग देखील लागूं देण्याचें साफ नाकारलें; परंतु 'काजीसाहेबांच्या घरीं पेटी सुरक्षित ठेवण्याकरितां आपण येथें आणिली आहे' असें मात्र सांगितलें. "खरं म्हटलं तर ती सरकारी खजिन्यांत ठेवायला पाहिजे आहे." महंमद म्हणाला.

हे शब्द ऐकतांच सर्व घोळका आश्चर्यचकित होऊन गेला.

"पैसा आहे का त्यांत ?" काजीसाहेबांनीं विचारलें.

"तें कांहीं बुवा मी सांगणार नाही."

काजीसाहेब पेटी हातांनीं उचलून म्हणाले, "जड आहे फार; पण ती राहील माझ्या कोठडींत बंदोबस्तानं."

महमद—पण तुम्ही ती उघडण्याच्या भरीस पडणार नाहीं ना ?

काजी—मुळींच नाहीं. माझ्यासारखा प्रामाणिक मनुष्य अशी गोष्ट कधीं करणार नाही. पण घटकाभर समज, तूं मध्येंच मेलास-बिलास तर ?

महमद—"तर माझ्या बायकोनें ती उघडावी-तिच्याशिवाय दुसऱ्या कोणीं तिला हात लावतां कामा नये. पण माझं लग्न झालं नसलं तर

तिची काय व्यवस्था करायची तें मीं आपल्या वुइलपत्रांत लिहून ठेवलं आहे नीट."

"वुइलपत्र" हा शब्द ऐकून महमदमिया-(कारण आतां महमद सुताराचे महमदमिया झाले होते.)-विषयीं लोकांत चळवळ उडून गेली: "तरी म्हटलं मियासाहेब अलीकडे दिल्लीस कां जात येत होते!"

"हो, वुइल तर करायलाच पाहिजे. मला इतकं सांपडल्यावर—नाहीं मिळाल्यावर—"इतके शब्द बोलून त्यानें मध्येंच जीभ चावली.

त्यानें व काजीनें मिळून ती पेटी काजीच्या तळघरांत नेऊन नीट ठेवली.

आतां मात्र लोकांस महमदानें फतिमेशीं शादी करण्याच्या बाबतीत जास्त प्रयत्न कां केला नाहीं व पोषाखांत कद्रूपणा करण्यास कां सुरुवात केली याचें कारण पुरतें समजलें. मियासाहेब अलीकडे मधून मधून दिल्लीस जात असत, तें कांही नेकटाय, कॉलरी आणायला नाहीं, कांहीं तरी पैशाची बाब होती, तो पैसा आतां त्यांना मिळाला. आतां ते या भिकार झकपकाबादेच्या वीस रुपये दरमहाच्या कोतवालाच्या मुलीशीं कशाला लग्न करतील? अशीच मोठ्या खानदानीच्या घराण्यांतली मुलगी त्यांनीं पाहिली असेल. शिवाय बाहेर ज्यांची झकपक त्यांच्या घरांत पूज्य व जे आंतून गब्बर असतात ते बाहेर अगदीं साधे असतात. या नियमानें महमदमियास मातब्बरी आल्याबरोबर त्यांनीं पोषाखी ऐट टाकून दिली, हें साहजिकच झालें. लौकरच त्यांना पैसा कसा मिळाला, याबद्दल वाटावाट चालू झाली. कोणी म्हणे 'त्यांना एका पिरानें प्रसन्न होऊन तो दिला.' कोणी म्हणे 'त्यांना घरांत खणतां खणतां पुरलेला सांपडला.' कोणी म्हणे 'त्यांचा एक नातलग दिल्लीस मयत झाला त्यानें त्यास ठेवला.' याप्रमाणें कोणी कांहीं, तर कोणी कांहीं, गप्पा त्या संपत्तीबद्दल मारूं लागले. गांवचे पोलिसपाटील 'तर त्या पेटींत बॉंब आहे' असें म्हणत

होते; पण या कल्पनेस कांहीं आधार नव्हता. दिवसेंदिवस या पेटींतील गौप्य कळण्याची उत्सुकता लोकांस वाटूं लागली व महमदाच्या मौन-व्रतानें तर ती अधिकच जोरानें फोफावली.

फतिमेची अलीकडे मोठी गडबड उडून गेली होती. त्यामुळें अहमदाची तर विशेषच धांदल उडाली. प्रथम प्रथम त्यानें तिची जिज्ञासा दाबून टाकण्याचा पुष्कळ यत्न केला, पण पुढें पुढें ती न ऐकतां महमदाकडे जाऊन त्याशीं सलगी करूं लागली. अहमद 'दुसऱ्याच्या गौप्याशीं आपल्याला काय करायचें आहे' असें म्हणे; महमद 'आपलें गौप्य दुसऱ्याला न कळविण्याचा आपला निश्चय आहे' असें सांगे. ती तें गूढ उकलण्याकरितां डोकें दुखेपर्यंत त्यास शीण देत असे, पण व्यर्थ! जो महमद तिची थुंकी झेलण्यासाठीं पुढें पुढे करीत असे तो आतां तिच्या विनवण्यांचा अत्यंत धिःकारपूर्वक अव्हेर करूं लागला. हा सर्व द्रव्यमद नसेल तर दुसरें काय असणार!

एके दिवशीं अशीच काकुळतीस येऊन ती त्याची विनंती करीत असतां तो म्हाणाला, "मी साफ दुसऱ्या-तिसऱ्या माणसाला सांगणार नाही. फक्त माझ्या लग्नाच्या बायकोला मात्र ती गोष्ट कळेल."

"तर मग मला ती कधींच समजणार नाहीं," त्याला टोंचून बोलण्याच्या उद्देशानें फतिमा म्हणाली.

पण आपल्यावर या टोंचून बोलण्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं असें दाखवीत तो "हो, असं वाटतं खरं." असें म्हणाला.

ती तेथून फणकाऱ्यानें निघून गेली व संध्याकाळीं अहमदास महमदाच्या पेटीतील गौप्प उघडण्याचा हुकूम करूं लागली. "जर माझ्यावर तुझं खरं प्रेम असेल तर तुला माझं एवढं काम केलंच पाहिजे."

"अग, असणार आहे काय त्या पेटींत! दोन रुपयांचा खुर्दा असेल झालं."

"हो, दोन रुपयांचा खुर्दा असेल! तसं असतं तर त्याला काजीसाहेब, बाबा, अबदुलखां यांनी जातांयेतां सलाम कशाला केला असता ?"

"हं! झांकली मूठ सव्वा लाखाची."

"बरं बरं! दीडशें रुपयांपेक्षां तर जास्त असतील!"

आतां मात्र अहमदाची पूर्ण निराशा झाली. इतके दिवस त्यानें पोषाकांत महमदावर प्रत्येक वेळीं ताण केली. पुढें बाप मरून त्याला दीडशें रुपये मिळाले. कुत्र्याच्या वेळींहि अहमदाची फजिती झाली, पण आतां शेवटीं ही गुप्तपेटी आपला पराजय करते कीं काय अशी त्यास भीति वाटूं लागली. तींत कांहीं अर्थ नाहीं, असें फतिमेस दर्शविण्याचा त्यानें पुष्कळ यत्न केला, पण फतिमा ऐकेना.

तें गौप्य समजण्याची उत्सुकता इतकी वाढली कीं तिच्यानें अधिक दम धरवेना. ती महमदाकडे जाऊन म्हणाली "हें पहा, त्या पेटींत काय आहे तें मला समजलंच पाहिजे."

"तें आपल्या बायकोशिवाय कोणालाहि सांगणार नाही असं मीं तुला पूर्वींच सांगितलं होतं!"

"तर मग मला सांग."

"म्हणजे तुझ्या मनांत"—

"हो. तें तर आतां आलंच." ती लाजल्यासारखें करून म्हणाली.

"पण बघ. त्याच्यांत पैसाबैसा कांहीं नाहीं, त्याच्यांत जी वस्तु आहे तिचा फक्त मलाच उपयोग आहे."

"कांहीं असो."—

"तूं त्या पेटींत पैसा आहे अशा समजुतीखालीं लग्नाला कबूल झालीस, पण मागून तुला वाईट वाटेल!"

"छे छे महमद! पैशाकरतां का मी तुझ्याशीं लग्न करायला तयार झाल्यें आहें? केवळ प्रेमासाठीं:"

"ठीक आहे. आपलं लग्न होतांच एकदम ती गोष्ट तुला कळेल."

महमदानें कोतवालसाहेबांची परवानगी मागितली व त्यांनीं त्याची मागणी मोठ्या आनंदानें कबूल केली. ठरल्याप्रमाणें लग्नाच्या दिवशीं मियांनीं ती काजीसाहेबांच्या घरून आणविली व पेटी जवळ ठेवून तिला म्हटलें, "समजा, या पेटींत कांही नसलं तर तुझ्या माझ्यावरच्या प्रेमांत कांहीं कमीं होणार नाहीं ना?"

"छे छे ! आपल्या पैशाकरतां का मी आपल्यावर एवढें जिवापाड प्रेम करत्यें ?" फतिमा म्हणाली. ती पेटी उघडतांच आपल्या नजरेस मोहोरा पडतात का नोटा पडतात, का सोन्यामोत्यांचे दागिनें पडतात अशा विचारानें ती फार उतावळि झाली होती.

"पहा बरं, आपलं बोलणं नीट ध्यानांत ठेव," असें म्हणून त्यानें कुलपाला हिसका दिला तोंच तें निघालें. मग त्यानें पेटींतून पांचसहा विटांचे टोले व एक कागदाचा तुकडा काढला. फतिमेस हा देखावा पाहून चक्करच आलें! त्या कागदावर लिहिलेला मजकूर महमदानें फतिमेस वाचून दाखविला—

"स्त्रीच्या जिज्ञासेची तृप्ति करण्याचें जोंपर्यंत तुझ्या हातांत आहे तोंपर्यंत निराश होऊं नको."

# लेखक आणि संपादक : : : ७

**सन १९३१**

मेहेरबान रा. रा. श्रीयुत संपादक मोहिनीकर्तेसाहेब यांच्या सेवेसी. कृतानेक शिर साष्टांग नमस्कार वि. वि. मोहिनी मासिकांत स्थळ मिळेल ह्या आशेनें मी आज रोजी 'चंपावतीचा राजा की राजाची चंपावती !' ही रहस्यपूर्ण मनोवेधक लघुभावकथा पाठवीत आहें. ही गोष्ट कशाचाहि अनुवाद किंवा नक्कल नाहीं. सुप्रसिद्ध लेखक प्रो. प्रियंवद:गोडबोले ह्यांनीं तिच्याबद्दल चांगले उद्गार काढिले आहेत. आपण ही लघुकथा छापिल्यास मजसारख्या होतकरू लेखकास प्रोत्साहन देण्याचें श्रेय आपल्याला लाभणार आहे. मोहिनीचे वर्गणीदार वाढविण्याची यथाशक्ति खटपट मी करीत आहें. - तरी मला आपण निराश करणार नाहीं अशी नम्र विनंती आहे. कळावें.

आपला,

नम्र सेवक,

**कचेश्वर खंडेराव गरुड.**

## वरील पत्राचें संपादकीय उत्तर

०

### सन १९३२

रा. रा. मोहिनीकर्ते संपादक महाशय यांस सा. न. वि. वि. आजरोजीं 'खुडलेली कळी' ही भावनाप्रचुर व हृदयंगम कविता आपल्या जगप्रसिद्ध मासिकांत प्रसिद्धीच्या आशेनें पाठवीत आहें. ही कविता जर आपण प्रसिद्ध केली नाहींत तर माझ्यासारख्या तरुण कवीची उमलती प्रतिभाकळी खुडण्याचें पाप आपल्या माथी बसेल. ह्या कवितेची वाखाणणी माझ्या वर्गबंधूंनीं आणि भगिनींनीं फार केली आहे. तरी तिला अवश्य स्थळ द्यावें आणि वर्गणीदार म्हणून माझें नांव दाखल करण्याची कृपा व्हावी. कळावें, हे विनंति

आपला,

**क. खं. गरुड**

संपादकांची छापील सूचना–'खुडलेली कळी' ही कविता कवीनें अर्ध्या आण्याचें तिकीट पाठवून एक महिन्याच्या आंत परत मागवून घ्यावी ःनाहींतर ती कळी निर्माल्यांत (अर्थात् के. टो.) टाकून देण्यांत येईल.

### सन १९३३

रा. रा. मोहिनीकर्ते यांस सा. न. वि. वि. आज रोजीं आपल्याकडे अरिस्टोफेन्सचें चरित्र व कार्य' हा निबंध पाठवीत आहे. त्यासाठीं आपल्या मासिकाचीं चार पानं अडवाल काय ? हा इंग्रजी निबंधाचा अनुवाद असून मूळ इंग्रजी निबंधाची योग्यता फार मोठी समजली

गेली आहे. आमचे तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर रामभाऊ राजवाडे यांच्या सूचनेवरून सदर अनुवाद मीं केला आहे. कळावें हे वि.

आपला,
**क. खं. गरुड**
( सी. बी. ए.
एल्फिन्सन कॉलेज )

संपादकांचें उत्तर—आपला लेख पावला. सवडीनुसार स्थळ मिळेल.

**सन १९३४**

मोहिनीकर्ते यांस स. न. वि. वि. आज रोजीं या पत्रासोबत मी 'लाल बदामची राणी' ह्या कादंबरीवर टीकालेख पाठवीत आहें. अरिस्टोफेन्सला चार महिन्यांनीं कां होईना पण स्थळ मिळालें याबद्दल मी आपला आभारी आहें. टीकालेख फार झणझणीत असला तरी मार्मिक व भेदक झाला आहे असें प्रो. प्रियंवद गोडबोले सुद्धां म्हणाले. आपल्या मासिकाचा अंक आमच्या हायस्कूल लायब्ररीत घेण्याचा ठराव लवकरच करणार आहों, असो. लेख जरूर येत्या अंकी घ्यावा. कळावें.

आपला,
**क. खं. गरुड, बी. ए.**
शिक्षक-इंदापूर हायस्कूल.

संपादकीय स्फुटांत संपादक म्हणतात, "आमचे होतकरू लेखक रा. गरुड यांचीं टीकारूपी नखें 'लाल बदामची राणी' कर्त्यास तिखटपणें बोचल्याशिवाय राहणार नाहींत अशी आमची खात्री आहे. ह्या गरुडाच्या भराऱ्या वाङ्मयाकाशांत उंच जावोत अशी आमची इच्छा आहे."

सन १९३६

प्रो. गरुडसाहेब यांस वि. वि. गेल्या तीन महिन्यांत मोहिनीस आपलें लेखनसाह्य कां बरें मिळालें नाहीं ? आपली 'खुडलेली कळी' ही सुंदर कविता 'रुक्मांगद'च्या ताज्या अंकांत आलेली आम्हीं पाहिली. तसेंच 'चंपावतीचा राजा की राजाची चंपावती' ही रोमांचकारी दीर्घ लघुकथा 'दुर्वास'च्या स्तंभांत आलेली पाहून आम्हांस फारच वाईट वाटले. 'मोहिनी' आपलीच आहे. तिजवर असा रोष होऊं नये. दिवाळीच्या अंकासाठी आपल्याकडून अवश्य साहित्य मिळालें पाहिजे. यंदा दिवाळीच्या अंकाच्या लेखकांस देण्यासाठी मोबदल्याची रक्कम आम्हीं वेगळी काढून ठेविली आहे. कळावें, हे वि.

आपला,

संपादक—मोहिनी.

सा. न. वि. वि. ओरिएन्टल कॉन्फरन्सकरितां निबंध लिहीत असल्यानें आपल्या दिवाळी अंकास लेख देणें शक्य होणार नाही अशी भीति वाटते. तूर्त मजवर लेखासाठी विसंबून राहूं नये.

आपला,

**क. खं. गरुड, एम्. ए.**

प्राध्यापक, कोंकण कॉलेज, ठाणे.

**प्रो. गरुड यांस तार.**

पाठवा लेख आणि आपला फोटो मोहिनीच्या दिवाळी अंकाकरितां खोळंबा झाला आहे.

संपादक, मोहिनी.

**दिवाळी अंकाच्या जाहिरातींतून**

'मी यशस्वी लेखक कसा झालों.' प्रो. गरुड यांचा उद्बोधक अनुभव तुम्हांला त्याच खास अंकांत वाचावयास मिळेल.

## खडीसाखरेचा खडा : : : ८

काका आणि काकू हें एक प्रेमळ जोडपें शांतारामाच्या चाळींत तीस वर्षीपासून एकाच बिऱ्हाडांत राहत असे. उतारवय झालें तरी दोघांच्या संसारांत तिसऱ्या जिवाची भर पडली नव्हती. मग मुलें होऊन ती गेलीं कीं झालींच नाहीत, तें मला माहीत नाही. काकांचा एक भाऊ अमदाबादेस राहत असे. त्याची मुलगी रेवा ही मुंबईसच दिलेली होती, तिला चारपांच मुलें होतीं. रेवा वारंवार आपल्या मुलांना घेऊन काकांच्या बिऱ्हाडीं येत असे. कधी कधीं राहतहि असे. एकादे वेळीं मुलें रात्रीं स्वतःच्या घरीं परत न जातां काकांच्या घरीं मोठ्या खुषीनें राहत असत.

कारण घरच्यापेक्षां आजोळीच त्यांचे लाड जास्त होत असत. काका-आजोबा त्यांना बोलपट पाहण्यास घेऊन जात; -बोलपटानंतर त्यांना उपाहारगृहांत नेऊन थंड पेयें आणि चमचमीत खाद्यें यांचा पुरवठा करीत. काकू त्यांना जेवतांना गोड गोड पदार्थ वाढी आणि खेळणीं घेऊन देई. तेव्हां त्या मुलांना काका-आजोबांचा आणि काकू आजीचा लळा लागावा यांत कांहींच नवल नाहीं.

तथापि या नातवंडांनी मधूनच यावें, आपल्याला लुबाडावें आणि सकाळी घरी परत जावें, ह्यायोगे त्या वृद्ध दांपत्यास समाधान वाटेना. विशेषतः काकू-आजीस वाटूं लागलें की यांतलीं एकादी मुलगी आपण स्वतःच्या मुलीप्रमाणें लहानाची मोठी करावी. पुढें आपल्या खर्चानें तिचे लग्नहि करून द्यावें, म्हणजे म्हातारपणी दुर्बलतेचा काळ घालविण्यास एखादें मायेचें आणि हक्काचें ठिकाण होईल. इतक्या पुढचें कोणीं पाहिलें आहे म्हणा ! निदान सध्यां तरी घरांत एकसारखी गडबड मारणारें, सांडलवंड करणारें मूल घरांत असलें तर घराची चैतन्यहीन उदासीनता नष्ट होईल.

पतीची संमति काकूनीं तत्काळ मिळविली. काकू रेवाच्या घरीं गेल्या आणि रेवा व तिचे यजमान रेवादास यांस त्यांनी आपला विचार कळविला. गोमेचा एकादा पाय तुटल्यानें ती जशी लंगडी होत नाहीं, त्यप्रमाणेंच रेवाचे एकादें मूल आजोळी राहण्यास गेल्यानें तिचा संसार सुना भासणार नव्हता. इतकेंच नव्हे, आपल्या एका मुलीस अधिक चैनीत आणि थाटात राहण्याची संधि मिळत आहे असें पाहून त्या दोघांस समाधानच वाटलें.

रेवाची तीन वर्षांची मुलगी नबू (नर्मदा) ही फारच गोड आणि हुशार होती. इतकी लहान असून बोबडें मुळीच बोलत नसे. काकू-आजीच्यावर आणि काका-आजोबांच्यावर तिची छाप विशेष बसलेली होती. तिलाच घेऊन जाण्याचें काकूंनी ठरविलें आणि लगेच नबूची संमति मिळाली. तिचे चिमुकले कपडे आणि खेळणी एका पिशवीत ठेवण्यांत आलीं आणि तिला घेऊन काकू आपल्या बिऱ्हाडीं आल्या. नबूनें रात्रीं आईची आठवण काढली नाहीं. दोनचार दिवसांनीं आई भेटतच असे, त्यामुळें दोघींना जड वाटलें नाहीं. नबू आल्यानंतर थोड्याच दिवसांत काकांच्या बिऱ्हाडांत बदल दिसून आला. दोन खाटांच्या

मध्यें एक चिमुकली खाट आली; भिंतींवर रंगीत चित्रें टांगण्यांत आलीं; एका दोरीवर लहान लहान चड्डया आणि झगे वाळूं लागले. कपड्याच्या कांच-कपाटांतील कापडाची जागा वेगवेगळ्या खेळण्यांनी घेतली आणि घरभर चित्रांची पुस्तकें, चित्रें, बोळकी, शंख-शिंपले इत्यादिकांचा पसारा दिसूं लागला. लहानसा रंगीत पाट, चिमुकली ताटली आणि बारीक लोटीभांडें यांची स्वयंपाकघरांतील सामानांत भर पडली. ज्या बिऱ्हाडाजवळ म्हाताऱ्याकोताऱ्यावांचून कोणी सहसा फिरकत नसे, तिकडे चाळींतील मुलांमुलींच्या टोळ्या धांवपळ करूं लागल्या. नबूला खेळण्यासाठी एक स्पॅनिअल जातीच्या कुत्र्याचें पिलूंहि काकांनी खरेदी केलें. तें पाहून काकूंनी एक दाट केसांचें गुबगुबीत इराणी मांजर आणून ठेविलं.

'एवढ्या गडबडीत रेवादासची बदली सिकंदराबादेस झाली. बिऱ्हाडास सरकारी जागा मिळाल्यानें तो सहकुटुंब तिकडे गेला. नबू आजाआजी-जवळ लाडांत आणि थाटांत आनदानें राहत आहे असें पाहून त्यांनीं तिला मुंबईसच राहूं देण्याचे ठरविलें. आईबाप आणि भावंडें परगांवीं गेलीं तरी नबूनें त्यांच्याबरोबर जाण्याचा हट्ट धरला नाहीं.

काकू आणि काका सकाळीं लवकरच उठत. काका आवडत्या व्यायामशाळेवर देखरेख करण्यासाठीं तिकडे निघून जात, तर काकू गृहकृत्यें करण्यास लागत. चांगलें उजाडल्यावर कुत्र्याला त्या हुकूम देत, " वाघ्या, ताईला उठव. " लगेच कुत्रा नबूच्या उशाशी जाऊन मोठ्यानें भुंकून तिला जागी करीत असे. त्यानंतर एका बाजूस वाघ्या आणि दुसऱ्या बाजूस मावशी ( मांजरी ) ह्यांच्यासह नबूचे दुग्धपान बादशाही थाटांत होत असे.

दुग्धपान पुरें होत आहे तोंच तिच्यासाठीं ठेवलेल्या खास शिक्षिका कुमारी चंपावती चाफेकर (किंडर गार्टन, मॉंटेसरी आणि कांदिवली

डिप्लोमा; साहित्यविशारद; संगीत कौमुदी) ह्या बिऱ्हाडीं येऊन दाखल होत असत. त्यांच्याबरोबर नबूताई फिरावयास जात. चौपाटीवरील बागेंत सृष्टिज्ञान व गाणीं यांची ओळख त्यांस करून देण्यांत येई. दुपारीं जेवण होतांच शिशुविहारसंस्थेंत ती खेळावयास जाई. संध्याकाळीं काका आणि काकू यांच्याबरोबर फिरणें किंवा सिनेमा पाहणें अशा प्रकारचा तिचा अगदीं राजशाली कार्यक्रम असे. काका त्या नातीवर फारसे भाळले नव्हते; पण काकूंना मात्र ती आपला जीव कीं प्राण आहे आणि आईपेक्षांहि आपल्यावर तिचें अधिक प्रेम आहे, असें वाटत असे. कधी कधीं त्या तिला, विचारीत "ताई, मी चांगली कीं आई चांगली ?"

जरा विचार करून नबू म्हणे, " आई कांहीं वाईट नाहीं, पण काकू-आजी, तिच्याहून तूं चांगली आहेस. "

ह्या गोड उत्तरानें खाऊच्या रूपानें त्या पोरीला ताबडतोब बक्षीस मिळे. काका उपेक्षायुक्त दृष्टीनें हा प्रकार पाहून म्हणत, " अहो,-खाऊपुरतं ह्या पोरीचं हें बोलणं आहे. मातीचे कान चिटकवल्यानं का-यमचे कां होणार आहेत ? " यावर मानेला जोराचा हिसका मारून काकू आपली नापसंती व्यक्त करीत

पांच-सहा महिने गेले, सिकंदराबादेस रेवाचे डोळे बरेच बिघडल्या-मुळें ती मुंबईस डोळे तपासून घेण्यास येणार होती. आतां तिचें बिऱ्हाड मुंबईस नसल्यानें काका-काकूंकडेच ती उतरणार होती. आई येणार हें कळल्यापासून नबूची कळी चांगलीच उमलली. आईचा वियोग प्रथम कांहीं दिवस तिला जाणवला नाहीं. स्पॅनिअल कुत्रें, इराणी मांजर, खास शिक्षिका, चाकोलेटें, बिस्किटें, आणि हिंडणें-फिरणें ह्या गोष्टी नवीन होत्या तेथपर्यंत तिला त्यांची गंमत वाटत होती; परंतु दोन-तीन महिन्यांनीं त्या सर्व गोष्टी अंगवळणीं पडून तिला त्यांचें

महत्त्व वाटेनासें झालें. भावंडांची आणि आईची आठवण आतां तिला ठळकपणें होऊं लागली.

रात्रीं अपरात्रीं जर ती जागी झाली, तर डोळे मिटलेल्या स्थितींत ती 'आई' अशीच हांक मारी. "काकू आजी, मला पाणी," असें न म्हणतां "आई, मला पाणी," असेंच ती म्हणत असे. काका आणि काकू हीं दोघें आपल्या चैनी पुरवणारीं माणसे आहेत असें ती समजत असे. त्या दोघांबद्दल तिच्या मनांत कृतज्ञता वास करीत असे–अर्थात् तिला त्या भावनेचें नांव माहीत नव्हतें—पण तिचा जीव आई आणि भावंडें यांच्यासाठीच तळमळत असे. आई येणार असे कळतांच आनंदाच्या भरांत तिने इतकी उंच उडी मारली कीं काकूंच्या मनांत मत्सराची ठिणगीच उत्पन्न झाली. "कारटीचं मी इतकं करतें पण मला पाहून हिला ह्याच्या शंभरावा हिस्सा तरी आनंद झाला आहे का कधी?" त्या मनांत म्हणाल्या.

आईला आणण्याकरितां बोरीबंदरवर सकाळी मद्रास मेलच्या वेळीं जाण्याचें ठरलें होतें. रोज सकाळी नऊ वाजेपर्यंत निजून रहाणारी ती मुलगी अंधारांतच जागी झाली आणि तिने काकाकाकूंस पहांटेच स्टेशनवर जावयास लाविलें. ठरल्याप्रमाणें मद्रास मेलनें आई आली. नबू तिच्याजवळून बिलकुल हालेना, एकसारखी तिच्या पाठीशीं लागली होती. सकाळी दहाचा सुमार होता. रेवा आरशासमोर बसून स्वतःचे केस विंचरीत होती. काकू जवळच खुर्चीवर बसून तिला सिकंदराबादचा हकीकत विचारीत होत्या. दुसऱ्या एका खुर्चीवर बसून काका मधून मधून वर्तमानपत्र वाचीत होते आणि मध्येच त्या दोघांच्या गप्पांत तोंड घालीत होते. नबूनें एक जस्ताची डबी आणली आणि रेवा जवळ उभी राहून डबी उघडीत ती म्हणाली, "आई, तुला खडी-साखर हवी आहे का ग?"

"मला नको, तूंच खा म्हणजे माझं पोट भरेल." रेवा म्हणाली.

"नाहीं, तूंच खा म्हणजे माझं पोट भरेल," असें म्हणून नबूनें डबींतला एक खडा काढून बळेंच आईच्या घशांत कोंबला. नंतर "गोड लागती आहे का नाहीं?" असे म्हणत आईचे तोंड उघडून आणखी दोन खडे बळेच तिने त्यांत घातले. रेवानें प्रेमानें त्या खडी-साखरेपेक्षां गोड असणारा तिचा पापा घेतला

हें मातृकन्या प्रेमाचें मनोहर दृश्य काकांनी आपल्या नेहमींच्या उपेक्षायुक्त उपनेत्रांतून पाहिले व स्मित केले; पण काकू मात्र हें दृश्य पाहतां पाहतां अतिशय गंभीर होत गेल्या. "नबू अन् मला ग?" त्यानी म्हटलें.

राहिलेले दोन तीन खडे स्वतःच्या तोंडांत टाकून हसत हसत रिकामी डबी खडबड वाजवीत नबू म्हणाली, "खलास!"

काकूंच्या क्रोधभावनेचा उद्रेक अवर्णनीय होता. "कारटे, आईच्या घशांत ती नको म्हणत असतांना खडीसाखर बळेंबळेंनं कोंबलीस अन् मी आर्जवानं मागत असतांना मला एक कण दिखील दिला नाहींस! हे म्हणत होते, 'मातीचे कान चिकटवून चिकटत नसतात' तेंच खरं. माझे डोळे आतां चांगलेच उघडले. कलम केलेली माया उपयोगाची नसते. देवानं सत्तेचं दिलं नाहीं म्हणून उसनं घ्यायला गेलें, ही माझी चूकच झाली. रेवा, तूं परत जाशील तेव्हां आपल्या मुलीला घेऊन जा. आम्ही दोघं राहूं एकटचि आतांपर्यंत राहिलों तशी!"

दोन-तीन दिवसांनी इंग्रजी दैनिकांत खालील जाहिरात "विक्रीसाठीं" ह्या सदराखाली झळकली. "विकणें आहे. एक कॉकर स्पॅनिअल कुत्रा आणि एक इराणी केसाळ मांजरी. त्याचप्रमाणें मुलांची लोखंडी कॉट. खालील पत्त्यावर तपास करा. काका, शांतारामाची चाळ, मुंबई ४."

# गणोबास हाती द्यावा : : : १

आचार्य प्रल्हाद केशव अत्रे, संपादक 'नवयुग' राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री.

स्नेहांकित चिंतामण विनायक जोशी मुक्काम बडोदें येथें आज मितीपर्यंत सुखरूप असों. विशेष आपणाकडून आपल्या वृत्तपत्राच्या खास अंकासाठी पत्रलेखन करावयास आज्ञा झाली ती वाचोन हृदयास परम हर्ष जाला. परंतु हल्लीच्या काळी सामान्य लोकाभिरुचीस मानवणारें बाष्कळ प्रेमसाहित्य आम्ही लिहीत नसल्यानें अस्सल मराठवाडयांतील ऐतिहासिक सत्यकथा लिहिण्याचा आम्हीं विचार केला आहे.

श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीत मराठा सैन्यानें निजामशहाचे लातूर हें ठाणें हस्तगत करून घेतलें. लातूर येथें गणोबा सकपाळ यास ठाणेदार नेमिण्यांत आलें. गणोबा हा अत्यंत पाजी, क्रूरकर्मा असा अंमलदार होता. त्याने ब्राह्मण लोकांच्या वृत्त्या हिरावून घेतल्या, स्त्रियांस अब्रूनें रहाणें अशक्य केलें आणि प्रजेची बहुत तजावजा केली. कोण्हाचा पायपोस कोणाचे पायांत नाही ऐसें अनुचित घडों लागलें. गणोबा हा निजामशहास फितूर होऊन हिंदु प्रजेचा छळ करूं लागला. देवीदास नामक एका ब्राह्मणाचे सुंदर स्त्रीवर त्याची पापी नजर

होती. कांहीं तरी निमित्य काढोन त्यानें देवीदासावर खोटा आळ आणोन देवीदास आणि त्याचे स्त्रीस त्यानें आपल्या वाडयाच्या एका खोलींत कोंडोन ठेविले आणि तेथें स्वतःशी कुकर्म करणेविषयी तो तिची आर्जवें करो लागला. तथापि ती स्त्री महान् पतिव्रता पुण्यशील असल्याने गणोबास वश झाली नाही. देवीदास यास उलटें टांगून मिरच्यांची धुरी दिल्ही. चाबकांनी त्याच्या पाठीचें चामडें लोळविलें आणि त्यास भर दुपारीं तापल्या तव्यावर उभें ठेविण्यांत आलें; परंतु देवीदासानें आपल्या स्त्रीस पातिव्रत्यापासून च्युत होण्याचा उपदेश केव्हाहि केला नाही.

श्रीमंत पेशवे सरकारची बाकी थकल्यामुळें श्रीमंतांनी आपले बंधु सदाशिवराव भाऊसाहेब यांस लातूर ठाण्याचा कब्जा घेण्यास फौजेनिशी पाठविलें. श्रीमंतांची स्वारी लातूरपासोन वीस कोसांवर बार्शी येथे मुकामांत असता देवीदासाचा सासरा त्रिसोबा तट्टू यानें श्रीमंतांच्या रपेटीच्या वेळीं रस्त्यांत लोळण घेतली. श्रीमंतांनीं घोडा थांबवून काय अर्जी आहे असें मोठ्या ममतेनें विचारलें. त्रिसोबानें आपल्या जांवयाचे आणि कन्येचे होत असलेले मनस्वी हाल श्रीमंतांच्या चरणी विदित केले. श्रीमंतांचें अंतःकरण अत्यंत मृदु आणि हळुवार तें तेव्हांच द्रवलें. आतांच्या आतां मुकाम हालवून लातूरला चला. एका मजलेंत लातूर गाठून ब्राह्मणाचें आणि ब्राह्मण स्त्रीचें रक्षण केलें पाहिजे. हिन्दु स्त्रियांच्या अब्रूचें रक्षण आमच्या हातून न जाहलें तर थोरल्या छत्रपतीनीं हिन्दु पदपादशाही व्यर्थ स्थापिली असा शब्द लागणार नाहीं काय ? असे उद्गार भाऊसाहेबांच्या श्रीमुखांतून निघतांच सर्व फौज एका मजलेंत वीस कोस जाऊन पोचली. ह्या मोठ्या मजलेमुळें कित्येक स्वार, घोडे आणि बैल तोंडास फेस येऊन प्राणांसहि मुकले !

भाऊसाहेबांच्या आगमनाची बातमी कानीं पडतांच गणोबा अटाळीवर चढले. दुरून येणारी फौज पाहातांच त्यांचें धाबें दणाणलें. ते पार्श्वभागावर पदकमले वाहून जे पळत सुटले ते थेट निजामशहाचा तळ परळी वैजनाथास ठोकलेला होता तेथें पोचले. खाविंद आसरा आपलाच आहे. आपल्या जोरावर म्या हिन्दूस जरबेंत ठेविलें आणि पेशवे सरकारकडे एक वर्षांत जमीनमहसुलाचा भरणा केला नाही. तारणें किंवा मारणें आपल्या हाती आहे. ऐसे बोल निर्वाणीचे काढों लागला. निजामशहानीं त्यास रक्षणाचें आश्वासन दिलें आणि म्हटलें जोंपर्यंत माझ्या दाढींत एक तरी केश शिल्लक आहे, तोंपर्यंत तुला गनिमाकडून कोठल्याहि प्रकारची तकलीफ होणार नाही.

निजामशहाचे आश्रयाखाली गणोबा सुखरूप आहेत ऐसें पाहोन श्रीमंतांचें मस्तक भडकलें. त्यांही पत्रलेखकास बोलावून सांगितलें, आतांच्या आतां निजामशहाला पत्र लिही. आमच्या सरकारचा हरामखोर गणोबा सकपाळ यानें एक वर्षांत जमीन महसूल भरला नाहीं, देवब्राह्मणांचा छळ केला आणि गर्ती स्त्रियांची अब्रू घेतली हें तुम्हांस माहीत असून त्याचा पक्ष तुम्ही घेत आहां हें फार खराब आहे. या योगे आमची खुशी राहणार नाहीं. सबब पत्रदर्शनीं गणोबास हाती द्यावा. अपमान केल्यास किंवा दिरंगाई लाविल्यास मुलाहिजा होणार नाहीं. बहुत काय लिहिणें. लेखनसीमा.

हें पत्र निजामशहाकडे रवाना झाल्यावर गणोबा आपले हाती आल्यावर त्याला कोणती शिक्षा द्यावी याचा विचार चालू झाला. पंतप्रतिनिधीनी सुचविलें जे त्यास हत्तीचे पायाशीं बांधून मारून टाकावा. सिंधे यांहीं सुचविलें जे त्याचे डोकींत मेखसू ठोकून त्याचें उन्मत्त डोकें फोडावें. कोणी म्हणाले त्याचे हातपाय तोडावे, तर दुसऱ्या कोणी त्याच्या हातापायात बेडया ठोकून त्याचा कडेलोट करावा असेंहि

सुचविलें. तो दिवस मावळला. दुसरा दिवस उजाडला. पण गणोबाचा पत्ता नाहीं. गणोबास हाती दिल्याशिवाय आम्ही स्नानसंध्या करणार नाही असे श्रीमंत म्हणों लागले. सिंधे स्वतः घोडयावर स्वार होऊन निजामशहाच्या गोटांत गेले आणि त्यांनी श्रीमतांचा उतावळेपणा निजामशहास विदित केला. निजामशहाने उत्तर दिले ऐसे जे आज अस्तमानी गणोबास हाती देण्यात येईल, श्रीमंतांनी वाटेल तर स्वतः येऊन रुबरु खात्री करावी. श्रीमंतांनी निर्वेधपणें स्नानसंध्या करावी. आम्ही आपले वचनास न जागलो तर मक्कामदिनेची कसम खाऊ. सिंधे माघारे फिरले. श्रीमंतांस त्यांनीं स्वहस्ते स्नान घातले आणि श्रीमंताचे भोजन आणि वामकुक्षी झाल्यावर सूर्यास्तचा समय प्राप्त जाहला. अद्याप तो यवन वचनाप्रमाणे गणोबास हाती का देत नाही? चला त्या यवनाची शेंडी पकडून त्याला वचनभंगाचे योग्य पारिपत्य करूं असे म्हणोन श्रीमंत घोडयावर चढले. समागमे सिंधे, पंतप्रतिनिधि, बाबुजी नाईक, येसाजी इत्यादी सरदार होते.

परळीजवळ निजामशहाचा गोट होता तेथे गेले. यवन निमाज पढून हुक्का ओढीत बसलेला होता. भाऊसाहेबांस पाहताच नळी बाजूस ठेवून त्याने या श्रीमंत, आज आमच्या गरीबखान्याला श्रीमंतांचे पाय का लागले ? असें साक्षेपाने विचारलें. श्रीमंत म्हणाले, नबाबसाहेब गणोबास हाती द्यावयाचे तुम्ही लांबणीवर टाकत आहां याचा अर्थ काय! यवनाने उत्तर केले. श्रीमंतांच्या इच्छेप्रमाणे गणोबाला हाती देण्याची व्यवस्था झाली आहे. चला माझ्याबरोबर. ऐसे बोलोन त्याने आपला घोडा सज्ज करोन, श्रीमंतादिक मंडळीसह तो परळी गांवांत एका चौकांत उभा राहिला. श्रीमंतहि उभे राहिले. ताशे वाजंत्री यांचा घोष कानी पडला. वाद्यांच्या घोषांत गणोबास आपल्या हाती देण्यात येणार आहे असे श्रीमंतांस वाटले. थोड्याच वेळांत ताशेवाले वाजंत्री

समोरून पुढे सरकले आणि एक श्रृंगारलेला हाती समोरून जात असलेला त्यांनी पाहिला. आम्ही घोड्यावर बसलो असोन आमचे समोरून हा कोण मगरूर हातीवरोन जात आहे ? श्रीमंतांनी रागास येऊन प्रश्न केला. निजामशहा हासोन म्हणाला, श्रीमंत, आपल्या इच्छेप्रमाणे गणोबास हाती देण्यात आला आहे. आता त्याला हातीवरोन उतरण्यास सांगणे म्हणजे पंतप्रधानाचा हुकूम मोडण्यासारखे होईल. श्रीमंत म्हणाले, हाती हें जनावर देण्यास आम्ही सांगितले नव्हते. हाती म्हणजे हातांत देण्यास सांगितले होते. वाचणाऱ्या कारकुनाची ही चूक आहे. त्याला पकडून आणा म्हणजे ह्याच हातीच्या पायी त्याला देऊन टाकतो. निजामशहा म्हणाले, ही लिहिणाराची चूक आहे. पुढे मागे पेशवे सरकारात आणि आमच्यात खर्डेघाशांची लढाई होण्याचा संभव आहे. पण ती सध्याच नको. सिंधे यांनीहि श्रीमंतांचे समाधान केले. जे झाले ते झाले. गणोबास हाती मिळाला व तो सहीसलामत सुटला. आता पुणियासी परत जाऊन पत्रलेखकास शुद्ध लिहिणेयास शिकवू, म्हणजे पुन्हा ऐसा घोटाळा होणार नाही. गणोबास हातीच्या पोषणाकरितां एक गाव मोगलाईतून मिळाला. याप्रमाणें अशुद्ध लिहिणे याने कैसा गैरसमज उत्पन्न होतो ते आपणास कळविलें आहे. अशा प्रकारच्या ऐतिहासिक गोष्टी आपल्या लोकप्रिय वर्तमानपत्रांत देत जाव्या. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

## कालिंदीची कहाणी : : १०

प्रिय वाचक हो! ह्या तुमच्या एका काळीं कपाळकरंट्या ठरलेल्या पण आतां मुलें, सुना, जांवई आणि नातवंडें ह्यांनीं गजबजलेल्या वाड्यांत पतीसह आनंदानें कालक्रमणा करणाऱ्या भाग्यवान् भगिनीची कहाणी ऐका आणि जर तुम्ही माझ्यासारख्या दुखाःनें पोळलेल्या असाल तर माझें अनुकरण करून सुखी व्हा. ही माझी कहाणी माझ्या असंख्य भगिनींना सांगून त्यांस दुःखमुक्त करीन असें त्या प्रबल योगिनीला वचन दिल्यामुळेंच जाहिरातींचा अफाट खर्च करून मी आपली गोष्ट जगापुढें मांडीत आहें.

माझा जन्म सहारानपुर जिल्ह्यांतील धूपछांव गांवांत श्रीमंत आईबापांच्या पोटीं झाला. मी आईबापांची एकुलती मुलगी व एकटेंच अपत्य असल्यानें त्यांनीं मोठा खर्च करून अंबाला जिल्ह्यांतील नवाबपुरा येथील एका खानदानीच्या पण गरीब वराशीं माझा विवाह करून दिला. माझ्या दुर्दैवानें माझ्या लग्नानंतर सहा महिन्यांत माझे आईबाप मृत्युमुखीं पडले. माझी सर्व संपत्ति पतीनें ताब्यांत घेतली. उशिरां संपत्ति मिळालेल्या इतर तरुणांप्रमाणें माझ्या पतीस अनेक व्यसनांनीं गुरफटलें.

प्रथम प्रथम शेजारीपाजारी आणि नोकरचाकर यांच्याकडून माझ्या कानीं हे प्रकार येऊं लागले, पण मला ते खोटे वाटले. पुढें आमचा मुनीम देवचंद म्हणाला, "बाईसाहेब माझं म्हणणं खोटं वाटत असेल तर चला आत्तांच्या आत्तां माझ्या बरोबर. शेठसाहेब कोणत्या थराला पोंचले आहेत तें मी तुम्हांला प्रत्यक्ष दाखवितों."

तत्काळ मीं ड्रायव्हरला मोटार जोडण्यास (!) सांगितलें आणि देवचंदाला बरोबर घेऊन मी अंबाला शहराच्या बाजारपेठेंत जाऊन एका उंच इमारतीपुढें हजर झाल्यें. देवचंद म्हणाला "बाईसाहेब, गुलाबकळी नांवाच्या नायकिणीचं (त्यानें अस्सल हिंदुस्थानी शब्द वापरला होता पण तो येथें देणें मला प्रशस्त वाटत नाहीं.) हें घर आहे. वरती नाचरंग चालला आहे. तुमच्यासारख्या पडदानशीन बाईनं वरती जाणं बरोबर नाही. आपणच हॉर्न वाजवून शेठसाहेबांना खालीं बोलावूं."

ड्रायव्हरनें हॉर्न वाजविल्यावर माझे पति खाली आले. त्यांच्या मागोमाग ती मेली गुलाबकळी पण नाचत मुरडत आली. पतीस झिंगलेल्या अवस्थेंत पाहून मी दचकल्यें. त्यानीं विचारिलें, "काय ग, माझा पाठलाग करीत तुला इथं कोणी आणलं?" मी त्यांचा हात धरून म्हणाल्यें, "नाथ, घरीं चला. ह्या अवदसेच्या नादीं लागूं नका." पतींनी माझ्या हाताला हिसडा दिला आणि तिरस्कारानें म्हटलें, "जा काळुंद्रे, तूं कोळशांतलं माणिक आहेस म्हणून मीं तुला पत्करलें नाहीं. तुझ्या बापाच्या पैशाकडे पाहून मी तुला माझी बायको केली. ही प्यारी गुलाबकळी पहा, तिच्या शरीराची कांति पहा. तिचे गुलाबी कोलिंङ्कसारखे नाजूक हात पहा, विलायती दारूपेक्षां लाल असलेले गाल पहा. आणखी स्वतःचं रूप आरशांत पहा. गुलाबकळीची तस्त धुणारी मोलकरीण देखील गोरी आहे! अन् तूं पंजाबी म्हशीला लाजवशील

इतकी काळी आहेस; मी तुझ्या अंगाला स्पर्श देखील करायला तयार नाहीं. तुला वाटलं तर ह्या देवचंदाबरोबर संसार कर. ह्यः ! ह्यः ! ह्यः !"

अशा प्रकारचे हृदयाला घरे पाडणारे शब्द बोलून माझे पति गुलाबकळीच्या खांद्यावर हात टाकून माडीवर निघून गेले. मी निराश अंतःकरणनें घर सोडलें. ज्या ठिकाणी पतीला आपली किंमत नाहीं अशा घरांत राहाण्यांत काय अर्थ होता ?

भिक्षा मागत मागत मी हिमालयाच्या निरनिराळ्या भागांतून प्रवास करूं लागल्यें. कोळशासारख्या आपल्या काळ्याकुट्ट हातांपायांकडे पाहून माझी मलाच किळस येऊं लागली आणि जेव्हां एकाद्या हिमनदींत मी डोकावून पाही तेव्हां वानराच्यासारखें आपलें काळेंकुळकुळीत तोंड पाहून माझी मलाच लाज वाटे. मानस सरोवरांतील दुग्धधवल हंस माझ्या कृष्णवर्ण देहाचें बुजगावणें पहाताच कल कल करीत उडून जात. मीं ह्या 'कल' शब्दाचा अर्थ 'उद्यां' असा करून "उद्यां तूं आमच्या सारखी गौरवर्ण होशील" असा त्यांचा आशीर्वाद समजें, पण तो उद्यांचा दिवस उगवेना. शेवटी एका उंच कडयावरून आपलें तिरस्करणीय धूड ढकलून देण्याच्या निश्चयानें मी एका शिखराच्या कडेला जाऊन उभी राहिल्यें. तेथून भूमिभाग दिसत देखील नव्हता. ओढणी कंबरेस बांधून केस घट्ट करून मी डोळे मिटले आणि उडी घेतली. निमिषार्धानें डोळे उघडून पाहात्यें तों मला एका तेजःपुंज आणि कांतिमान् देवतेनें हातावर झेलून घेतलें आहे असें दिसलें. तिनें मला भुईवर उभें केलें. त्या देवतेचा वर्ण चंद्राला, चाफेकळीला, गुलाबाच्या पाकळ्यांना आणि निर्मेळ दुधाला लाजिवणारा होता. मीं मोठ्या भक्तीनें तिच्यापुढें प्रणिपात केला. मला उठवीत ती म्हणाली ! " बेटी, माझ्यापुढें नमस्कार घालूं नको, मी देवी नाहीं, तुझ्यासारखीच एक मनुष्य आहें; पण अबला मात्र नाहीं. ह्या देहाला प्रबल योगिनी म्हणतात. बेटा, ज्या दुःखानें

तूं जिवावर उदार झाली आहेस तें तुझं दुःख अंतर्ज्ञानानें मला कळलं आहे. तुझ्या शरीराचा वर्ण बदलून गोरा वर्ण येण्याची तुझी इच्छा मी पूर्ण करीन, मग तूं आपल्या पतीकडे परत जा आणि सुखाचा संसार कर."

प्रबलयोगिनींचे शब्द ऐकून मला किती आनंद वाटला असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. मी तिच्या पवित्र आश्रमांतील फुलें सकाळीं खुडावी, कपिला गाईचें दूध काढावे, येणाऱ्या जाणाऱ्या महात्म्यांची सेवा करावी, अलकनंदेच्या पवित्र प्रवाहांत स्नान करावें—अशा उच्च आयुष्यक्रमापुढें पंजाबांतल्या क्षुद्र संसाराची आठवणहि राहिली नाही. नित्य सकाळी, मध्यान्ही आणि सायंकाळीं योगिनीनें दिलेल्या गोळ्यांतील एकेक गोळी गायीच्या दुधाबरोबर मी सेवन करीत असें. त्याचप्रमाणें तिनें दिलेला सुवर्णलेप देहाला चोपडून दोन घटकांनीं स्नान करीत असे. या दिव्य औषधाच्या सेवनानें माझा कोळशासारखा असलेला देह कांही दिवसांनीं दगडाच्या वर्णासारखा ईषत् कृष्ण झाला. नंतर तो तपकिरी रंगावर जाऊन अनुक्रमानें त्यानें हळद, सोनें, सोनचाफा आणि गुलाबपुष्प यांची कांति धारण केली. रंगवलेल्या युरोपियन तरुणीच्या शरीरकांतिपेक्षां माझी स्वाभाविक कांति अधिक तेजोमय झाली.

"बेटा, आतां तुझं दुःख हरण झालं आहे. तूं आपल्या घरीं आतां परत जा. मनुष्यवस्तीपर्यंत पोंचवायला माझा शिष्य तुझ्याबरोबर येईल." योगिनी म्हणाली.

मला रडूं कोसळलें. " माई, ह्या पवित्र स्वर्गातून संसाराच्या ओंगळ नरकांत मला कां लोटतेस ? मी आतां जन्मभर तपोवनांतच राहीन, त्या व्यसनाधीन पतीची चाकरी करण्यापेक्षां तुझीच सेवा करीत रहावं अशी माझी इच्छा आहे, " मी म्हणाल्यें.

प्रबल योगिनीनें पतीची सेवा हीच स्त्री जन्माची सार्थकता आहे असें बजावल्यावर आणि पुष्कळ वादविवाद झाल्यावर मी पंजाबांत परत जाण्यास आणि पतीबरोबर संसार करण्यास कबूल झाल्यें. मात्र माझ्या-सारख्या दुसऱ्या ज्या अभागिनी काळ्या भगिनी असतील त्यांचें दुःख निवारण करण्यासाठी मला दिलेल्या गोळ्या आणि लेप यांची कृति तिनें मला सांगावी असा हट्ट मी धरिला. योगिनी म्हणाली, "बेटी, तुला माहीतच असेल कीं पार्वती प्रथम काळी होती. शंकर तिला नेहमी 'काली काली' अशी हांक मारायचे. तिला वाईट वाटलं. तिनं ह्याच आश्रमांत येऊन तपश्चर्या केली आणखी गोरा रंग संपादन केला. नंतर शंकर तिला 'गौरी' म्हणूं लागले. पार्वतीनं ही गोळ्यांची अन् लेपाची कृति स्वतः शोधून काढली. मला तिच्याकडूनच ही समजली. आतां तुला ती मी देत आहें. या कृतीवर एका गवताच्या काडीइतकी किफायत जरी तूं मिळ-वलीस तरी तुझा वर्ण नष्ट होईल. इतकच नाही, तर ही कृति तूं विसरून जाशील. शक्य तितक्या अधिक बायकांना ह्या कृतीचा लाभ मिळावा म्हणून तूं काय करशील ?"

"वर्तमानपत्रांत जाहिराती देऊन ह्या दिव्य औषधींचा प्रचार करीन. माते, मात्र जाहिरातीच्या खर्चापुरते पैसे लोकांकडून घेण्याची अनुज्ञा तूं दिली पाहिजेस.—" मीं विनंती केली.

"ठीक आहे, बेटी. जाहिराती, टपालखर्च अन् औषधी द्रव्याची मूळ किंमत एवढयापुरते पैसे घ्यायला हरकत नाही. जा बेटा, माझी समाधीची वेळ झाली आहे. बेटा शारंगधर !" आपल्या एका शिष्याला हांक मारीत ती म्हणाली, "ह्या तुझ्या ताईला रक्सौल स्टेशनपर्यंत नेऊन पोंचीव. तेथून ती आगगाडीनं पंजाबांत परत जाईल. तूं परत येतांना सुईदोरा अन् अंगारडब्ब्या नेऊन ये."

प्रबल योगिनीचा निरोप घेऊन शारंगधराबरोबर मी रक्सौलला आल्यें. तेथें येतांच देशरिवाजाप्रमाणें घुंगट धारण करणें मला भाग पडलें. पण उजळ तोंडानें जोंपर्यंत मी फिरत होत्यें तोंपर्यंत माझ्या मुखाकडे पाहून लोक थक्क होत इतकी मी आतां सुंदर दिसूं लागल्यें होत्यें. माझे नाकडोळे मूळचे रेखीव असले तरी ते काळ्या डांबरांत बुडाल्यामुळें खुलून येत नव्हते. आतां गौरवर्णामुळें त्यांची खुलावट झाली होती. शारंगधरानें नवाबपुऱ्याचे तिकीट माझ्या हातीं देऊन माझा निरोप घेतला. दुसऱ्या दिवशी नवाबपुऱ्यास पोचल्यावर मी आपल्या घरीं म्हणून गेल्ये. गांवांत कोणीही मला ओळखलं नाहीं इतका माझ्या स्वरूपांत फरक पडला होता. मी घरांत पहात्यें तों अगदीं निराळी माणसें तेथें दिसत होती. त्यांना मी विचारिलें, "कालिंदीनाथाचं हेंच घर ना?" त्यांनी मला सांगितलें, "कालिंदीनाथानं हें घर विकलं आहे. लाहोरच्या त्रैलोक्यनाथ कपूरनीं हें विकत घेतलं आहे. कालिंदीनाथ तिकडे अंबाल्याला गुलाबकळीच्या वाड्यांत कुलुंग्या कुत्र्यासारखे पडून असतात."

लगेच मी अंबाल्याला गेल्यें. गुलाबकळीच्या घराजवळ पोचल्यावर घराभोंवतीं गर्दी जमलेली मला दिसली. लोक "हुर्यो हुर्यो, बरी झाली बेशरम कुत्र्याची फजिती!" अशा अर्थाच्या पण अत्यंत अचकट-विचकट आरोळ्या ठोकीत होते. मी जवळ जाऊन पाहिलें तर माझे पती एका धोतरानिशीं रस्त्यांत झुकांड्या खात होते. एक फाटका गंजीफ्राक त्यांच्या खांद्यावर लोळत होता. अंग चर्मरोगानें चिडलेलें, दाढी बोटभर वाढलेली, डोळ्यास चिपडें, पोट खपाटीस गेलेलें अशी त्यांची दीनवाणी चर्या पाहून मला भडभडून आलें. ती बाजारबसवी गुलाबकळी अर्धवट केलेल्या पेहेरावानें रस्त्यांत येऊन हातांत धरलेल्या खेटरानें माझ्या पतीस बडवीत होती. तिच्या तोंडांतील आक्षेपार्ह शब्द

वजा केल्यास तिचें बोलणें असें होतें-" मेल्या भिकारड्याजवळ नाहीं दमडी नि् गुलाबकळी बाळगायला पाहिजे! म्हणे तुझ्यापायी मीं भिकेला लागलों! फार झालं तर तुझ्याकडून मला पंचवीस हजार रुपये मिळाले असतील. अरे पंचवीस हजार म्हणजे एका बैठकीतली माझी पिंक आहे पिंक! लाखोपतींना मी धुळीला मिळविलं आहे अन् त्यांत ते फुशारकी मानतात. तुझ्यासारख्या डुकराची किंमत काय? जा आतां आपल्या काळुंद्र्या घुशीकडे नि नीट संसार कर!" मला भयंकर संताप आला. " वेश्ये, काळुंद्री असेल तुझी आई! कोणाला म्हणतेस काळुंद्री?" असें म्हणत तिच्या थोबाडांत चार फटके लगावले. लोकांनीं हा तमाशा पाहून पुनः आनंदानें आरोळ्या ठोकल्या. माझ्या अनपेक्षित हल्ल्यानें गुलाबकळी भांबावून गेली. गाल चोळीत ती मुकाट्यानें उभी राहिल्यावर मी पतीस विचारलें, "नाथ, दासीला ओळखलं का?"

"आवाजावरून अन् तोंडावरून तूं माझी धनीण कालिंदी असावीस असं वाटतं. पण ही दिव्य अंगकांति पाहातांच ती तूं नाहींस अशी खात्री होते," पति म्हणाले.

"तीच मी आपली आज्ञांकित कालिंदी. हिमालयांतल्या एका योगिनीच्या प्रसादानं मला ही दिव्य कांति प्राप्त झाली आहे. चला घरीं. ह्या बाजारबसवीचा नाद सोडा." मी म्हणाल्यें.

पति "मला क्षमा कर" असें म्हणत माझ्या पायां पडूं लागले. त्यांस निवारण करून आम्हीं दोघें, आश्चर्यानें थक्क होऊन आ पसरून उभ्या राहिलेल्या गुलाबकळीच्या तोंडावर थुंकून, तेथून निघालों.

पंचवीस वर्षें झालीं ह्या गोष्टीला. आतां माझें घर लेकीसुनांनीं, मुलांजावयांनीं गजबजलेलें आहे. प्रबल योगिनीला दिलेल्या वचनाप्रमाणे

तिनें सांगितलेल्या गोळ्या आणि सुवर्ण-लेप यांचा प्रचार भगिनीवर्गांत मोठ्या प्रमाणावर मी केलेला आहे. ह्या दोन प्रासादिक औषधांची कृति जनहितार्थ आणि महिलादुःखनिवारणार्थ येथें मी देत आहें:—

प्रथम खालील वनस्पतींच्या बिया मिळवून त्या उन्हांत सुकवाव्या. नंतर त्या उंटिणीच्या दुधापासून केलेल्या तुपांत तळाव्या आणि त्यांचा बारीक खल करावा: कुत्तरशिंगी, धूमधडाका, फसफशी, मीनाक्षी, वनमाला, रानकोबी, गांवकीगोरी, जंगलकी रानी. प्रत्येक वनस्पतीच्या बियांबरोबर एक तोळा, दोन मासे, चार गुंजा घ्याव्या. या बियांचा खल झाल्यावर सर्व चूर्ण एकत्र मिसळून तें काळ्या कांचेच्या कुपींत घालून अंधाऱ्या जागेंत एक दिवस, दोन प्रहर, चार घटका ठेवावें.

ह्यानंतर पुढें दिलेली तेलें एकत्र मिसळून तीं लाकडाच्या कढईत घालून विस्तवावर ठेवावीं: मगर माशाचें तेल, बकुळीचें तेल, लोखंडाचें सत्त्व, मोत्याचा अर्क आणि कांचेचा आसव. हें मिश्रण चांगलें उकळूं लागल्यावर त्यांत प्रथम सांगितलेलें चूर्ण मिसळावें. आणि तें घट्ट होई-पर्यंत सोन्याच्या उलथन्यानें ढवळावें. ढवळीत असतांना, "माझा वर्ण गोरा होवो" असा अष्टाक्षरी मंत्र सारखा जपावा. मिश्रण घट्ट झाल्यावर बंदुकीच्या गोळ्यांएवढ्या त्याच्या गोळ्या तयार कराव्या.

यानंतर सुवर्ण-लेपाची कृति सांगावयाची राहिली. रानघोड्याचें शिंग सहाणेवर उगाळून त्याचा लेप तयार करावा. तो चांदीच्या वाटींत घालून, वाटी चांदण्यांत ठेवावी. नंतर धमासा, धपाटा, नागरमोथा आणि हरण-उडी ह्या चार वेलींचीं फुलें जमवून तीं पाण्यांत घालून तें पाणी ज्या वेळी चंद्रग्रहण आणि सूर्यग्रहण एकदम येतील त्या वेळीं उघड्या आकाशाखालीं परातीत ठेवावें. तें अशा बेतानें कीं सूर्य आणि चंद्र ह्या दोघांचीं प्रतिबिंबें त्या पाण्यांत पडतील. लगेच असा चमत्कार होईल कीं तें पाणी एकदम मेणासारखें घट्ट होईल. मग त्यांत मधाशीं केलेला

रानघोड्याच्या शिंगाचा लेप मिसळावा की, अंगकांति सुधारणारा दिव्य सुवर्ण-लेप तयार झाला. वाचक हो! योगिनीच्या कृपेने वरील गोळ्यांच्या आणि लेपाच्या सेवनानें मीं जशी कालिंदीची गौरी होऊन पतीचें प्रेम संपादन केले, तसें तुम्हांला पतीचें किंवा पत्नीचें प्रेम काबीज करतां येणार नाही काय ? त्यासाठी तुम्हांला माझ्याप्रमाणें हिमालयांत वणवण हिंडायला नको. घरच्या घरी प्रयोग करून पाहा. पण यदाकदाचित् वरील वनस्पती मिळणें असाध्य असेल तर आणि तरच माझ्याकडे मनीआर्डरने दहा रुपये पाठवा. केवळ आतील द्रव्यांची किंमतच आहे ही. नफा किंवा श्रमाचा मोबदला मी घेत नाही, कारण प्रबल योगिनीला तसें वचन दिलें आहे. लगेच पोष्टानें तुमच्याकडे बत्तीस गोळ्यांची डबी आणि लेपाची बाटली येतील. मग पहा चमत्कार ! जास्त काय लिहूं ?
माझा पत्ता:—

सौ. अध्यात्मदेवी, योगाश्रम, पोष्ट काळाबाजार, सहारानपूर, पंजाब.

## गैरसमज : : : ११

लाहोरपासून सुमारें बारा कोसांवर कमोके नांवाचें गांव आहे. तेथील एका मोठ्या घराच्या पिछाडीच्या बाजूनें अंधाऱ्या दगडी जिन्यांतून वर गेल्यावर दोन लहानशा भिकार खोल्यांचें बिऱ्हाड आहे. त्या जिन्याच्या लगेच वर दुसरा जिना असून तो घराच्या 'बगीच्यांत' जातो. खोलीचें दार तिकडल्या रीतीप्रमाणें सदैव बंदच असतें. घराचा मालक नारायणदास भाड्याची चोपडी घेऊन त्या दाराशीं आला आणि त्यानें दार ठोठावलें. "सरदार बलवंतसिंह, दार उघड, भाई," असें दोन-चार वेळां तो म्हणाला, मग दार उघडलें गेलें. नारायणदास आंत शिरला आणि म्हणाला, "बघा सरदार, आज एक वर्षांत भाड्यांतली पैदेखील वसूल झाली नाही. आझाद हिंद फौजेंत तुम्ही होतां म्हणून सहा महिनेपर्यंत मी दम धरला. तुमच्याकडून भाडं मिळणार नाहीं हें तर उघडच दिसतं आहे; पण सरदारजी, मेहेरबानी करून मकान सोडून तरी द्या, म्हणजे मी दुसरा भाडेकरी ठेवीन."

आंतल्या खोलीच्या दारांतून एका पोक्त स्त्रीचा आवाज आला, "शेठसाहेब, देशाच्या आझादीकरितां बलवंतला पगार सोडून द्यावा

लागला. तो जायबंदी झाला आहे. मकान सोडून आम्ही जाऊं तरी कोठें ?"

"माईजी, बलवंतसिंहाची देशभक्ति माझ्या खर्चानं काय म्हणून ? आझाद फौजेचा फंड जमा करताहेत त्यांतून मदत मिळवा. कांहीं करा, पण आतां एक महिन्याची मुदत तुम्हांला शेवटची देत आहें. मकान खालीं करा, नाहीतर शिपायाकडून तुमचं सामानसुमान बाहेर फेंकून द्यायला मी कमी करणार नाहीं." असें जोरानें बोलून नारायणदास पाय आपटीत निघून गेला.

थोड्याच वेळानें दूधवाला आला. त्याचेहि पुष्कळ पैसे थकले होते. त्यानें सांगितलें की आठ दिवसांच्या आंत आपली बाकी मिळाली नाही तर आपण रतीब बंद करूं.

बलवंतसिंह हताश स्थितींत खाटेवर पडून होता. त्याचा एक हात लढाईत तुटलेला असून दोन्ही पाय दुबळे झाले होते. तो जर ब्रिटिश सैन्यांतच राहिला असता तर त्याला शेंपन्नास रुपये निवृत्तिवेतन मिळालें असतें; परंतु योगायोगानें तो आझाद फौजेला जाऊन मिळाला. ब्रिटिश फौजेनें याला पकडलें, परंतु दुबळा असल्यानें त्याच्यावर खटला न करता त्याला घरीं पाठवून दिलें.

महायुद्धाच्या चौथ्या वर्षी इंफालजवळ ते दोघे पंजाबी अधिकारी लढत होते. एक बलवंतसिंह आणि दुसरा शार्दूलसिंह. दोघांनी एकमेकांजवळ आणाशपथा घेतल्या कीं आपण एकमेकांना यावज्जीव सोडावयाचें नाहीं; त्याचप्रमाणें दोघांच्या दरज्यांत कितीहि फरक पडला तरी एकमेकांनी एकमेकांस अंतर द्यावयाचें नाहीं. ते दोघे इंफालपासून चारपांच कोसांवरील एका उंच डोंगरावरून जपानी तळाची दुर्बिणीनें पहाणी करीत होते. शार्दूलसिंह मूळचा ड्राफ्टस्‌मन् ( नकाशानवीस ) असल्यानें तो कागदावर जपानी तळाचे नकाशे तयार करीत होता.

जपानी शिपायांनी दुर्बिणीने त्यांची ही क्रिया पाहिली आणि आठदहा जपानी शिपाई लपत छपत डोंगराच्या ह्या कड्यावर चढले. त्यांनीं दोघांही सरदारांस ( शीख लोकांत सर्वच पुरुषांस सरदार म्हणतात ) गिरफदार केलें.

जपानी तळांत आल्यावर त्या दोघांची मुद्दाम ताटातूट करण्यांत आली. बलवंतसिंहास रंगूनला पाठविण्यांत आलें. तेथें आझाद हिंद फौजेच्या चालकांनी त्याला आपल्या फौजेंत सामील करून घेतलें. त्याची कामगिरी नेहमी शौर्याची असे; परंतु जपान शरण आल्यावर तो ज्या तुकडीत काम करीत होता ती तुकडी ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या ताब्यात आली. त्या सर्व सैनिकांना लाल किल्ल्यांत नेण्यांत आलें; परंतु बलवंतसिंह मात्र घरी का परत आला ते वर सांगितलेंच आहे.

शार्दूलसिंह जपानी सैन्याबरोबर ब्रह्मदेशांत भटकत असतां ब्रिटिश सैन्याची एक तुकडी समोर आली. रात्रीच्या वेळी मगरांचें भय न बाळगतां शार्दूलसिह नदी ओलांडून परत ब्रिटिश फौजेत दाखल झाला. त्यानें आपल्याला कैद करणाऱ्या जपानी तुकडीची संपूर्ण माहिती इंग्रजी फौजेला दिली आणि त्या माहितीवरून इंग्रज फौजेनें रात्रीच्याच वेळीं जपानी तुकडीवर हल्ला करून जय मिळविला. शार्दूलसिंहाच्या या धाडसी कृत्याबद्दल त्याला बढती मिळून 'कर्नल' हुद्दा बहाल करण्यांत आला. युद्ध संपल्यावर तो हिंदुस्थानांत परत आला. बलवंतसिंहाला दिलेल्या वचनाची त्याला आठवण होती; परंतु त्याचा पत्ता शोध करूनहि त्याला मिळाला नाही.

माईजी अंधार पडल्यावर धान्य आणण्यासाठीं वाण्याच्या दुकानांत गेल्या. तेथेंहि त्यांची बाकी थकलेली होती. त्यामुळें त्यांस कांहींच मिळालें नाहीं. दुबळ्या मुलाला खायला काय घालूं याची त्यांना चिंता पडली. रात्री जेमतेम मूठभर कणकीची रोटी भाजून

त्यांनीं मुलाला दिली आणि आपल्याला बुधवारचा उपास आहे अशी थाप मारून थंडा फराळ करून त्या खाटेवर पडल्या. उपाशीं पोटी झोंप कशी येणार ?

"बेटा, शार्दूलभाई तुझा दोस्त आहे असं तूं म्हणत होतास तो मेजर की कर्नेल झालेला आहे असं मी ऐकलं. त्याच्याकडून कां नाहीं तूं मदत मिळवीत ? तो कुठें आहे त्याचा पत्ता काढ अन् त्याला जाऊन भेट" माईजीनी उपदेश केला.

"माईजी, सारख्या दर्जाच्या माणसांतच दोस्ती राहूं शकते. त्याला जर आणाशपथांची आठवण राहिली असती तर एव्हांना त्यानं माझा पत्ता काढला नसता का ? " बलवंतसिंह म्हणाला.

"तो तुझा शोध करीतहि असेल. तूं इथें ह्या भिकारी गांवांत कंगाल बिऱ्हाडात रहातो आहेस. तुझा पत्ता शोध करणाराला तरी कसा लागेल ? तूंच त्याचा शोध काढ. सुदामा कृष्णजीचा शोध करीत द्वारकेला गेला होता; कृष्णजी नाहीं आले आपल्या दरिद्री भक्ताचा पत्ता काढीत?"

दुसऱ्या दिवशीं बलवंतसिंहाला त्याचा एक नातेवाईक येऊन भेटला. त्याच्या हातांत एक वर्तमानपत्राचा ताजा अंक होता. त्यांत खालील बातमी होती :—

'रविवारी सायंकाळीं ठीक सहा वाजतां कर्नल शार्दूलसिंह यांच्या हस्तें पोलिस फुटबॉल टीमला बक्षिसें वांटण्याचा समारंभ पोलिस ग्राउंडवर होणार आहे.'

बातमी वाचतांच आनंदानें तो उद्गारला, "माईजी, शार्दूलसिंहाचा पत्ता लागला ! रविवारीं लाहोरास पोलिस ग्राउंडवर त्याच्या हातून बक्षिस-समारंभ व्हायचा आहे. ठीक ठीक, मी तिथेंच जाऊन त्यांना भेटतों."

रविवारीं बक्षिस-समारंभाच्या जागीं शार्दूलसिंह खुर्चीवर येऊन बसला होता. समारंभास पंधरा मिनिटें अवकाश होता. बलवंतसिंहाला त्याच्या नातेवाइकांनीं धरून पोलिस ग्राउंडवर नेलें होतें. शार्दूलसिंहाला पाहतांच त्याला प्रेमाचें भरतें आलें. धडका हात पुढें करून तसाच लंगडत तो शार्दूलसिंहापुढें जाऊन उभा राहिला. आपला हात तो घट्ट धरून प्रेमानें हालवील असें बलवंतसिंहास वाटलें होतें; परंतु हस्तांदोलन करण्याचे राहोच; त्यानें बलवंतसिंहाकडून दुसरीकडे तोंड वळविलें आणि शेजाऱ्याशी कांही बोलणे केले. पुनः एकदां बलवंतसिंहाकडे त्यानें तोंड केले, पण ओळखहि दिली नाही. हें पाहतांच बलवंतसिंह माघारी फिरला. त्याच्या हृदयावर मोठाच आघात झाला. त्याच रात्रीं हातांतील कृपाणानें त्यानें स्वतःचा प्राणनाश करून घेतला !

बक्षिस-समारंभाला प्रारंभ करतांना पोलिस कमिशनर म्हणाले, "मित्र हो, कर्नल सरदार शार्दूलसिंह ह्यांच्यासारख्या बहाद्दराच्या हातून बक्षिसं घेतांना तुम्हांला अभिमान वाटला पाहिजे. कर्नलसाहेब जपानांत लढत असतांना ॲटम बॉम्बच्या हल्ल्यापासून जवळच पराक्रम गाजवीत होते. आपल्या सहजीं लक्ष्यांत येणार नाहीं, पण ॲटम बॉम्बच्या परिणामानं त्यांचे दोन्ही डोळे पूर्ण आंधळे झालेले आहेत. आणि आंधळे झाल्यावरदेखील त्यांनीं आपल्या सेनेला बहुमोल दिग्दर्शन केलेलं होतं. सर्वांच्या वतीनं मी त्यांना बक्षिसं देण्याची विनंती करतों."

## मिळवत्या बायकोचा नवरा : : १२

पुरुषांचा स्वभाव कसा दुतर्फी असतो ! कुटुंबांतील माणसांवर निराधार होण्याची पाळी यावी ही कल्पना त्यांस जितकी असह्य वाटते तितकीच त्यांनीं आपल्यावर अवलंबून नसावें ही कल्पनाहि त्यांस कडू लागते.

माझे मित्र गंपूनाना (मी शाळेंत शिक्षक होतो तेव्हांची गोष्ट आहे ही) एक दिवस शाळेंत वर्गावरून शिकवून येतांच शिक्षकांच्या खोलींत गादीवर धाडकन् आपटले. डोक्यावरील पांढरा फेटा फेंकून देऊन कोटाच्या गुंड्या सोडून टाकून ते धापा टाकूं लागले. शिक्षकांच्या खोलींत मीच काय तो त्यांच्याशिवाय हजर होतों. इतर शिक्षक आपापल्या वर्गावर निघून गेले होते आणि मला तो तास मोकळा होता.

गंपूनानांच्या काळवंडलेल्या चेहऱ्याकडे पाहून मी जरा घाबरलों. त्यांना पंचपात्रीभर पाणी पाजून ताडाच्या फाटक्या पंख्यानें त्यांस वारा घालूं लागलों. गंपूनाना अगदीं घाबरून गेलेले होते. "जोशीमास्तर, माझं कसं होईल हो?" त्यांनी दीनवाण्या मुद्रेने विचारिलें.

" गंपूनाना, तुम्ही सन्-स्ट्रोकनं घाबरलेले दिसतां. आज हवेंत

उष्णता भयंकर आहे, आत्तां बरे व्हाल वारा मिळून, तुम्ही बिलकुल घाबरूं नका. " मी त्यांस आश्वासिलें.

"घाबरूं नको तर काय करूं हो, जोशी मास्तर ? माझा संसार मोठा, आठ मुलं आहेत मला. पगार अवघा पन्नास रुपये, त्यांतून आम्ही पडलों ड्रॉइंग मास्तर ! शिकवण्या-बिकवण्याचं उत्पन्न आम्हांला कुठून असणार ? अन् मला अशी भीति वाटत असते कीं, केव्हां तरी हें काळीज आपल्याला दगा देणार ! पहा पहा माझी नाडी किती मंद झाली आहे ती ! " माझ्या हातांत आपला हात देत ते म्हणाले.

गंपूनानाची नाडी मला मुळीच लागली नाही, कारण नाडी कोणत्या ठिकाणी असते याचीच मला माहिती नव्हती ; परंतु त्यांना धीर देत मी म्हणालों, "गंपूनाना, तुमची नाडी तर अगदीं चांगली नॉर्मल चालली आहे. "

आपली नाडी चांगली चालत असावी हे गंपूनानांस आवडलें नाहीं. त्यांनीं आपल्या हातांत माझा हात पकडून तो आपल्या काळ-जाजवळ नेला. आणि म्हटलें, "पहा हो मास्तर, छाती किती जोरानं धडधडती आहे!"

गंपूनानांची छाती धडधडत नव्हती. पण तसें म्हटल्यास त्यांना आवडलें नसतें म्हणून छाती धडधडत आहे ही गोष्ट मीं कबूल केली. "वडिलानी एक हजार रुपये कर्जाशिवाय मला कांहींहि ठेवलं नाहीं. पन्नास टिकल्या पगारांत दहा पोटं भरून मीं कसे दिवस काढले असतील तें देवाला ठाऊक ! पण हार्ट फेल होऊन जर मी मरून गेलों तर माझीं मुलंबाळं भुकेनं तडफडून मरायची वेळ येईल. देवा, देवा ! माझ्या कुटुंबाचं आतां कसं होईल ? " उपरण्यानें अश्रू पुशीत गंपूनाना मूकरुदन करूं लागले.

माझ्या हृदयाची कालवाकालव झाली. जर मी शाळेचा हेडमास्तर असतों किंवा दीडदोनशें रुपये पगाराचा दिपोटी असतों तर गंपूनानांस म्हटलें असतें, 'मास्तर, तुम्ही काळजी करूं नका. तसं कांहीं वेडं-वांकडं झालच तर मी तुमच्या मुलांचा परामर्ष घेतल्याशिवाय राहणार नाही.' पण मी साठ रुपये पगाराचा मास्तर–माझें मलाच पुरत नव्हतें. गंपूनानांस कशाच्या जोरावर आश्वासन देणार होतों मी ? पांच मिनिटें गप्प बसलों. इतक्यांत जुनी म्हण आठवली व त्यांना म्हणालों, "गंपू-नाना, जो चोंच देतो तो चाराहि देतो. कोणी कोणाच्या नशिबावर जन्माला येत नाही. अगदी जन्मदिवशीं आई मेलेलीं मुलं सुद्धां मोठीं होऊन संसार केलेली आहेत की नाही ? "

"तुमचं ब्रह्मज्ञान ठीक आहे, जोशी मास्तर, पण चारा न मिळा-ल्यानं तडफडून, तोंड वासून, जिवंतपणीच मुंग्यांकडून खाल्ली गेलेलीं पाखरांचीं पोरं मी पाहिली नाहीत काय ? मी गरीब माणूस ! विमा उतरलेला नाही. पेन्शनफंड भरलेला नाही ! सगळ्यांत मोठा मुलगा अवघा बारा वर्षांचा अन् त्याला सात लहान भावंडं ! हें लेंढार त्याच्या उरावर टाकून जर मी मरून गेलो तर माझ्याबद्दल काय वाटेल त्याला !" पुनः स्फुदून स्फुंदून गंपूनाना रडूं लागले.

फारशी भाषेचे शिक्षक खान शिक्षकांच्या खोलीत आले. गंपूनानांस पाहून ते म्हणाले, "तोबा ! तोबा ! गंपूनाना काय झालं आहे तुम्हांला ? 'कलिजा खलास झाला' असं पद आहे तशी तर नाही ना तुमची स्थिति झाली ! " खान मूळचा मिरजेचा असल्यानें त्याची मातृ-भाषा आणि त्याचे संस्कार पूर्णपणें मराठी होते.

"खान्या, तुला ऊठसूट थट्टाच दिसते. अरे, खरोखरच माझा कलिजा कधीं खलास होईल त्याचा नेम नाही. मात्र तो पदांत सांगित-ल्यासारखा प्रेमामुळें नाहीं, पण खरोखरीच एकदम हार्ट स्टॉप होईल.

तुला काय बेटया अविंधला, तूं मेलास तर तुझी बायको पुनः निका लावील, पण माझ्या बायकापोरांचं कसं होईल या काळजीनं मी खंगत चाललों आंहें. " गंपूनाना म्हणाले.

खानांचें लग्न झालेलें नसल्यामुळें त्यांला चीड येण्याचें कारण नव्हतें. गंपूनानांविषयींच्या सहानुभूतीनें तो एकदम गंभीर होऊन गप्प बसला.

तास संपल्याची घंटा झाली. डोकीस फेटा बांधून आणि कोटाच्या गुंडया घालून उपरण्यानें डोळे पुशीत गंपूनाना चित्रकला-वर्गांत निघून गेले आणि मीहि एका हातांत रीडर आणि दुसऱ्यांत छडी घेऊन सहावी 'ड' तल्या 'ढ' ना पढविण्यास जिन्याकडे वळलों.

\+ \+ \+ \+

रात्रीं लौकरच जेवण उरकून शेजारी बागवे मास्तर रहात होते, त्यांच्याकडे गेलों आणि गंपूनानांच्या प्रकृतीविषयीं गोष्ट काढिली. बागवे म्हणाले, "गंपूनाना फार नर्व्हस आहे? त्याचं काळीज अशक्त झालं आहे याचं कारण त्याचा नर्व्हसपणा हेंच आहे. चला, आपण त्याच्या घरीं जाऊन त्याचा समाचार घेऊं या. "

बागव्यांची आणि गंपूनानांची कौटुंबिक ओळख असल्यानें मला ती सोबत फार बरी वाटली. आम्ही खालच्या आळींत गंपूनानांचें स्वतःचें लहानसें रहातें घर होतें त्यांत गेलों. घराच्या बाहेरच मांडवा-खालीं बाजेवर गंपूनानांची स्वारी अतिशय दुःखी चेहरा करून बसली होती. त्यांचा मोठा मुलगा त्यांना पंख्यानें वारा घालीत होता. आणि बाकीचीं मुलें शिक्षा झालेल्या गुन्हेगारांच्या टोळक्याप्रमाणें खिन्न होऊन एका फाटक्या सतरंजीवर एकत्र बसलीं होतीं. बागव्यांना पाहतांच गंपूनानांस गहिंवर आला. दोन्ही हात पुढें करून त्यांनी बागव्यांस जवळ बसविलें आणि मलाहि बाजेवरच बसण्यास सांगितलें. वारा घालणारा मुलगा पंखा माझ्या स्वाधीन करून साखळींतून मोकळ्या केलेल्या

कुत्र्याप्रमाणें आनंदानें पळून जाऊन आपल्या भावंडांत मिसळला.

"बापू, आज मी कसा घाबरून गेलों होतो तें जोशी मास्तरनीं पाह्यलंच आहे. ही पहा माझीं कच्चींबच्चीं कशीं निराधार झालीं आहेत! मी हार्ट-फेल होऊन पटदिशीं नाहींसा झालों तर शब्दशः भुकेनं यांचे प्राण जातील रे बापू !" असें म्हणून गंपूनानांनी हुदके देण्यास प्रारंभ केला.

पलीकडे बसलेल्या मुलांतील मोठ्या मुलीनें त्यांचें बोलणें ऐकून गळाच काढला. मला अतिशय चमत्कारिक वाटूं लागलें. नुकतीच ओळख झालेल्या गंपूनानांस समाधानाचे कोणतेहि शब्द सांगतां येणें मला शक्य नव्हतें. बागवे त्यांचे जुने मित्र होते. त्यांनी म्हटलें, " गंपू-नाना, आम्ही मित्रमडळी तुझं कांहीं कमी पडूं देणार नाहीं. त्यांतून वहिनी मोठ्या कर्तबगार आहेत. समज, तूं दुसऱ्या जगांत गेलास तरी त्या मुलांचा योगक्षेम चालवायला समर्थ आहेत. "

गंपूनानांच्या पत्नी बागव्यांस पाहून घराच्या दारांत येऊन उभ्या राहिल्या. त्यांच्याकडे बघून बागवे म्हणाले, " वहिनी, नानांनी हें काय वेड डोक्यांत घेतलं आहे? माझ्या मागें माझ्या मुलाबाळांचं कसं होईल, हा हृद्रोग त्यांना लागला आहे. "

वहिनी म्हणाल्या, " बागवे मास्तर, आतां ह्यांची समजूत मी घालूं तरी कशी तें सांगा. आधी म्हटलं तर त्यांच्या तब्येतीला कांहींएक विकार झालेला नाही. तो एक मेला सिव्हिल सर्जन कोणाला सांगतो तुमचं ब्लड-प्रेशर वाढलं आहे; तर कोणाला तुमचं कमी झालं आहे. त्याच्या बायकोला हे ड्रॉइंग शिकवायला जातात. शिळोप्याच्या गप्पा मारतांना-दिला बिनफीचा सल्ला झालं ! त्याच्यावर विश्वास ठेवून उगीच हे काळजी करीत बसलेले असतात. काळजी करण्यांतच त्यांना सौख्य वाटतं. कांहीं झालं नाही यांना. "

बायकोचे शब्द ऐकून गंपूनानांस बरें वाटलें नाही. ते म्हणाले, "बरं तुझं म्हणणं खरं मला कांहींएक झालं नाही; पण समज मोटारचा धक्का लागून किंवा फुरसं चावून अचानक आटोपलों तर तुमचं कसं होईल ? ही काळजी माझ्या रक्ताचं पाणी करीत आहे." एवढें बोलतांच त्यांस हुंदका आला.

वहिनी मिनिटभर थांबून म्हणाल्या, " देव करो अन् तसं कांहीं न होवो पण क्षणभर समजा, तसं कांहीं झालंच तर आतांपर्यंत जसं चाललं आहे तसंच पुढेंहि चालायला कोणती अडचण आहे ? "

" मी मेल्यानंतर माझा पगार चालू राहील असं का तुला वाटतं ? " —गंपूनाना.

बागवे मास्तर किंचित् हांसून म्हणाले, " गंपूनाना, हा एवढा मोठा संसार तुझ्या पन्नास रुपये पगारावर चाललेला आहे असं का तुला वाटतं ? तूं मेलास तर तेवढे रुपये घरांत कमी येतील हें खरं ; पण त्यांच्या बरोबर एक पोटहि कमी होईल हें तितकंच खरं नाही का ? "

वहिनीस बागव्यांच्या भाषणानें उत्तेजन मिळून त्या म्हणाल्या, "बागवे मास्तर, तितकी सुद्धां त्यांची मदत धरूं नका, पन्नास रुपयांतले कमीत कमी दहा रुपये तर त्यांचे विडीकाडी अन् पानसुपारी यांत खर्च होतात. विलायतेंतली ड्रॉइंगची पदवी घरबसल्या मिळावी म्हणून वर्षाचे तीस रुपये ते कुठल्याशा विलायती संस्थेला पाठवितात. चहा, गाणं आणखी ब्रिजमध्यें घालवलेले पैसे वजा जाऊन पंचवीस रुपये दिखिल हे घरांत देत नाहींत. उलट उठल्या-सुटल्यां नवीन पोशाख करायला अन् क्रिकेट मॅच पहाण्याकरितां मुंबईच्या वाऱ्या करायला माझ्याजवळूनच हे पैसे घेऊन जात असतात. मी गाण्याच्या अन् पेटी वाजवायच्या शिकवण्या करून दरमहा शंभर सव्वाशें रुपये कमावत्यें अन् त्यांतून हें सगळं चालल आहे. तीं पहा माझीं मुलं. एकाच्या

अंगावर तरी फाटका नाही तर मळका कपडा दिसतो आहे का ? घरीं दोन म्हशी ठेवून दुधाचा सगळा खर्च मी भागवत्यें नि प्रत्येक मुलाला रोज एक एक कप दूध प्यायला देत्यें. हे इतक सगळं ह्यांच्या पगारावर चालेल असं तुम्हांला वाटतं का, बागवे मास्तर ? ”

बागवे मास्तर म्हणाले. “ छान छान ! वहिनी, तुम्ही अप्रिय पण सत्य सांगितलंत. अप्रियस्यापि सत्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः । गंपूनाना, तूं बिलकुल काळजी करूं नकोस. तुझ्याशिवाय ह्या घरांत कांहीहि अडायचं नाही. उलट वाढत्या संसाराला उपयुक्त असा पायबंदच पडेल तुझं हार्ट-फेल झालं तर ! तर आतां तूं काळजी सोडून दे म्हणजे खडबडीत बरा होशील.

घरी परत येतांना गंपूनानांच्या कुटुंबाविषयी बागव्यांचे आणि माझें बोलणे झालें. गंपूनानांची बायको बायकांच्या गाण्याच्या शिकवण्या करून नवऱ्याच्या दुप्पट मिळकत घरांत आणीत असे आणि त्यामुळें गंपूनाना शिकवण्या किंवा एखादा आड धंदा न करितां काळजी करण्याचा शौक करीत असे, असें बागव्यांनी मला सांगितलें. एकंदरीनें गंपूनानांची झुरणी खरी नसून वेळ घालविण्याचें तें एक साधन होतें अशी माझी खात्री पटली.

× × ×

त्याच्या नंतर दुसऱ्या दिवशी माझी गंपूनानांशीं गाठ पडली. त्यानी लोकरीचा नवा कोट चढविलेला होता. कोटाचें कापड चाचपत मी म्हणालों, “गंपूनाना, काय भाव मिळालं हें कापड ? ”

“आठ रुपये वार प्रमाणें अडीच वार कापड अन् अस्तरासह दहा रुपये शिलाई असे तीस रुपये ह्या कोटाला पडले—” गंपूनाना.

पन्नास रुपये पगाराच्या माणसानें कोटापायीं तीस रुपये खर्चावे ही कल्पना मला जड वाटली.

"त्याचं असं आहे, जोशी मास्तर, हा कोट कुटुंबानं आम्हांला आमच्या लग्नाचा रौप्यमहोत्सव म्हणून प्रेझेंट केला आहे." गंपूनाना ऐटीनें म्हणाले.

अशी मिळवती बायको लाभल्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन केलें; पण ते त्यांना फारसें आवडलें नाही. "जोशी मास्तर, काल रात्री तुम्ही आलेच होतां आमच्या संसाराचा फार्स पहायला. मला फक्त पन्नास रुपये पगार आहे पण बायको शंभर रुपये मिळवते हें पाहून कदाचित् तुम्हांला माझा हेवा वाटला असेल." गंपूनाना बोलूं लागले.

त्यांस थांबवीत मी म्हणालों, "हेवा कसला, गंपूनाना, उलट मला बरं वाटलं की, तुमच्यावांचून तुमचं कुटुंब निराधार होण्याची भीति नाहीं हें पाहून, नाही तर आमच पहा. आम्हांला कुटुंबाच्या तरतुदी-करितां विमा उतरावा लागला आहे अन् पावपट पगार विम्याच्या हप्त्यांत खर्च होत आहे. तुम्हांला विमा उतरायला नको."

"मास्तर, इथेंच माझा मतभेद आहे. आपलं कुटुंब निराधार व्हावं असं कोणत्याहि पुरुषाला वाटत नाहीं; पण कुटुंबाला आपल्यावांचून दुसरा कोणी आधार असावा हें त्याला कधीहि पटायचं नाही. त्यांतल्या त्यांत बायकोचा आधार कुटुंबाला असावा हें तर नवऱ्याला अगदींच नामुष्कीचं वाटतं. कालच पाहिलंत ना कशी तडातड उत्तरं देत होती तें. म्हणे, माझा पगार मीच उडवून टाकतों नि घरांत खर्चायला कांहीं देत नाहीं नि तिच्याच शिकवणीच्या रुपयांनीं संसार चालतो. मी मेलों तर थोडासा खर्च कमी होईल एवढंच बोलायचं तिनं बाकी ठेवलं होत." गंपूनानांचा पारा सारखा चढत होता, "अशा तऱ्हेचा बायकोचा शिरजोरपणा केवळ मुलांच्या सुखाकडे लक्ष देऊन मी सहन करीत आहें. एखाद्या वेळी मनांत असं येतं कीं..." असें बोलून तें विचार करण्यासाठीं थांबले.

"सांगा ना काय वाटतं तें !"—मी.

"काय वाटतं तें सांगितलं तर मी कोणी एक दुष्ट राक्षस आहें असं तुम्हांला वाटेल, मास्तर, पण आतां सांगतोच. कारटी अन्नावांचून उपाशीं राहिली किंवा कपड्यांवाचून उघडीं राहिलीं तरी चालेल. पण आमच्या हिनं मिळवलेल्या पैशांनीं त्यांना गिळायला किंवा पांघरायला मिळूं नये. आपल्यावांचून आपलं कुटुंब सुस्थितींत राहूं शकावं ही कल्पना कोणत्याहि मानी पुरुषाला सहन होणार नाही ! "

बायकोच्या पैशानें विकत घेतलेला मौल्यवान् लोकरी कोट अंगावर चढवून त्याच्या रुबाबांत मानीपणाच्या वल्गना करणाऱ्या गंपूनानांच्या धाडसाचें मला आश्चर्य वाटलें. पण आजकाल रेशनिंग ऑफिसें उघडल्यापासून असे गंपूनाना घरोघर पाहावयास **मिळत नाहीत** काय ?

## दिवाणसाहेबांचें घड्याळ! : : १३

तिरुपतिनिवासी कस्तुरीरंगसुत कृष्णस्वामी आयंगार अथवा टी. के. कृष्णस्वामी आयंगार हे क्राउन रिप्रेझेंटेटिव्ह (राजप्रतिनिधि अथवा व्हाइसरॉय) यांच्या पोलिटिकल ऑफिसचे व्यवस्थापक होते. कामांत हुशार आणि अतिशय उतावळ्या स्वभावाचे, अशी ह्यांची ख्याति होती. त्यांच्या स्वभावांत अविचारीपणा एवढाच दोष होता आणि त्याचें प्रायश्चित्त त्यांना स्वतःला, त्याचप्रमाणें इतरांनाहि भोगावें लागे.

त्यांच्या पत्नी गौरीअम्मा ह्या पाकशास्त्रांत फार निपुण होत्या. एके वेळीं क्राउन रिप्रेझेंटेटिव्ह साहेबांनी सर्व आमदार-खासदारांस खाना दिला. शाकाहारी लोकांच्या खाण्याची व्यवस्था गौरीअम्मांनी स्वतः-कडे मागून घेतली. इतर पदार्थांच्या बरोबर त्यांनीं उप्पीट आणि पापडम् हे दाक्षिणात्य पदार्थ तयार केले होते. लेडी आयर्विन यांस तें उप्पीट इतकें आवडलें की, आठ-पंधरा दिवसांनी त्या गौरीअम्मां-कडून मुद्दाम तो पदार्थ तयार करवून त्याचा समाचार घेत.

अशा तऱ्हेनें दुहेरी वशिला पोंचल्यावर कृष्णस्वामींचा उत्कर्ष भरा-भर होत जावा यांत नवल नाहीं. त्यांतल्या त्यांत पोलिटिकल ऑफिसचा

संबंध संस्थानांशी येत असल्यानें संस्थानांत लागणाऱ्या सर्व वर्ण्यांचें तेंच केंद्र होऊन बसले आहे. ब्रिटिश नोकरींतून निवृत्त झालेले पेन्शनर त्याच आफिसमार्फत वेगळाल्या संस्थानांतून दिवाण, निरनिराळ्या खात्यांचे तज्ज्ञ किंवा राजपुत्रांना शिक्षक होऊन येत असतात. धरमगड संस्थानचे कारभारी मे. दीडमिशे सक्तीनें निवृत्त झाल्यावर 'आपल्याला नवीन कारभारी पुरवा' अशी मागणी राजेसाहेबांनी पोलिटिकल ऑफिसकडे केली. कृष्णस्वामीना दिल्लीत राहून कचेराच्या व्यवस्थापकाचें काम करीत बसण्याचा कंटाळा आलेला होता. वडाच्या सावलीतल्या झाडांप्रमाणेंच दिल्लीतल्या वातावरणांत कोणालाही बडें होतां येत नाही. कारण एकादा माणूस कितीही बडा झाला तरी त्याच्याहून बडे असे शेंकडों दुसरे लोक असतातच. त्यापेक्षां एकाद्या संस्थानांत दिवाणगिरी मिळाली, तर सत्ता, प्रामुख्य आणि संपत्ति या सर्वांचाच लाभ होईल अशा कल्पनेनें ते पोलिटिकल सेक्रेटरीला म्हणाले, "सर, धरमगडच्या कारभाऱ्याची जागा मला मिळाली, तर मी साहेबबहादुरांचा आजन्म ऋणी राहीन."

सेक्रेटरी म्हणाले, "कारभाऱ्याऐवजीं दिवाणाची जागा धरमगडचे राजे कां नाही करीत ? ठाकोर होते, त्याचे आतां राजे झाले आहेत."

"अर्थात् त्यांच्या संस्थानच्या प्रधानाचा हुद्दा दिवाण असाच केला पाहिजे, होय की नाहीं, सर? "

धरमगडचे पहिले दिवाण टी. के. कृष्णस्वामी आयंगार झाले, त्यांना दिवाण करण्याच्या अगोदर रावबहादुर अशी पदवी देण्यांत आली. दिवाणसाहेबांच्या भेटीसाठीं संस्थानचे पोलिटिकल सेक्रेटरी कॅप्टन रघुवीरसिंह हे आलेले असतांना नऊ वाजल्याचे ठोके मोठ्या घड्याळांत पडले. संस्थानांतील प्रत्येक गोष्ट चुकीची आणि मूर्खपणानें भरलेली

असते आणि म्हणूनच संस्थानची सुधारणा करण्याकरितां आपली नेमणूक झालेली आहे, अशी घमेंड ब्रिटिश नोकरीतून खटपटी करून संस्थानांत आलेल्या अधिकाऱ्यां त असते. तिला अनुसरून दिवाणसाहेब म्हणाले, "वेल कॅप्टन, घड्याळ बरोबर ठेवावं लागतं त्याची जाणीव सुद्धां इथ तुम्हाला झालेली दिसत नाही!"

कॅप्टन म्हणाले, "आम्ही रेल्वेच्या टाइमप्रमाणें आमची घड्याळं लावीत असतों."

"अं:, तुमची बी. बी. सी. आय रेल्वे कुजलेली अन् अनियमित आहे. तिच्यावरची घड्याळं कसलीं बरोबर असणार? आमच्या एस्. आय. आर. सारखी नियमित रेल्वे हिंदुस्थानांत दुसरी सांपडणार नाहीं."

'सर सर' करून उदयाला चढणाऱ्या मद्रासी लोकांच्या रेल्वेच्या नांवाची आद्याक्षरें देखील एस्. आय. आर. असावीं ह्या योगायोगाच्या कल्पनेनें, रघुबीरसिंहाला हंसू आलें. "आपण बरोबर आहां, सर," असें तो म्हणाला.

"आतां मी सांगतो बरोबर वेळ काय आहे तो." मेजाचा खण उघडून त्यांतून एक सोन्याचें घड्याळ बाहेर काढीत दिवाणसाहेब म्हणाले, "हें माझं घड्याळ एका सेकंदाची देखील चूक करीत नाहीं. हें लेडी विलिंग्डननीं लेडी कृष्णस्वामीना भेट म्हणून दिलं होतं... ओ लॉर्ड, हेहि संस्थानांत आल्याबरोबर थंड पडलेलं दिसतंय," असें म्हणून त्यांनी तें रघुबीरसिंहापुढें ठेवून दिलं.

रघुबीरनें त्याला किल्ली देऊन पाहिली. पण ती नुसतीच गरगर फिरत राहिली. त्यांतलि कमान (स्प्रिंग) तुटली असावी असा समज त्यानें प्रदर्शित केला.

"इथं दुरुस्तीला देण्यांत अर्थ नाही. मार्क्स अँड कोकडेच तें पाठवलं पाहिजे." दिवाणसांहेब म्हणाले.

वास्तविक ह्यापूर्वी ह्या घड्याळाची स्प्रिंग तुटली असतांना मिस्टर कृष्णस्वामी आयंगार ह्यांनी चांदणी चौकांतल्या टीचभर लांबीरुंदीच्या गाळ्यांत बसून घड्याळें दुरुस्त करणाऱ्या एका बेकार घड्याळजीकडून ती बसवून घेतली होती; पण आतां दिवाण झाल्यावर त्या घडयाळाचेही चोचले वाढले असल्यास नवल नाही.

"मग मी रात्रींच मुंबईस जात आहें. मार्क्सकडून स्प्रिंग बसवून आणतों," असें म्हणत रघुबीरने घडयाळ खिशांत टाकलें. ह्यानंतर दिवाणसाहेबांचे आणि त्याचें इतर कांही महत्त्वाच्या गोष्टींबद्दल खलबत होऊन रघुबीर निघून गेला.

आणखी दोन दिवस गेले. गौरीअम्मा पतिराजांशी बोलत होत्या "आज मी राजवाडयांत गेलें होतें. राणीसाहेबांना उप्पीट फारच आवडलं. मला लेडी विलिंग्डननी सोन्याचं घडयाळ दिलं आहे असं मी सांगितल्यावर त्या पाहूं पाहूं म्हणूं लागल्या. उद्यां त्यांना दाखवायला नेलं पाहिजे. आपल्याजवळच ठेवायला दिलं होतं."

"हें इथंच टेबलाच्या खणांत पडलं आहे," असें म्हणून दिवाणसाहेबांनीं खण उघडून पाहिला. कागदांच्या खाली दडलें असेल असें समजून त्यांनी त्याचा बराच शोध केला; पण तें सांपडले नाहीं. जरा बुचकळ्यांत पडून त्यांनीं दुसऱ्या खणांत पाहिलें; परंतु तेथेही सांपडलें नाही. "मला पक्की खात्री आहे, तें मीं इथंच ठेवलं होतं. ते" म्हणाले. दिवाणखान्यांतील कपाटें, आपल्या कपडयांचे खिसे वगैरे ठिकाणीं चांचपून पाहिल्यावर घडयाळ सांपडलें नाहीं. लगेच त्यांच्या नेहमींच्या उतावळ्या स्वभावाप्रमाणें त्यांनीं मेजावरील टेलिफोन उचलला आणि

००० नंबर लावून इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस खानसाहेब कैखश्रू मेरवानजी काब्राजी यांच्याशी बोलणें सुरू केलें. "हॅलो. काब्राजी, दिवाण इज स्पीकिंग—"

"गुड मॉर्नेंग, युअर एक्सलन्सी, मी काब्राजी बोलत आहें."

"खानसाहेब, माझं एक घडयाळ माझ्या टेबलाच्या खणांतून चोरीला गेलं. खुद्द संस्थानच्या दिवाणाच्या नाकाखाली अशी चोरी व्हावी हे पोलिस खात्याला खास भूषणावह नाही."

"आजपर्यंत असं कधीही झालं नव्हतं, सर, मी ताबडतोब तपास करायला आपल्या बंगल्यांत येतों."

पांच मिनिटांत काब्राजीची स्वारी दिवाणसाहेबांच्या खोलीत आली. टेबलाच्या कोणत्या खणांत कोणत्या कोपऱ्यांत घडयाळ ठेवलें होतं तें दिवाणसाहेबानीं सांगितल्यावर खानसाहेबांनीं विचारलें, "आपल्या पश्चात् ह्या जागेंत कोण येत असतं ?"

"माझ्या पश्चात् जमादाराशिवाय कोणीही ह्या जागेंत येत नाही. तो मात्र झाडझूड करायला, टपाल आणायला किंवा न्यायला पुष्कळदां ह्या खोलींत येत असतो. थांबा, त्यालाच इथं बोलावून घेऊं" असें म्हणून त्यांनी विजेच्या घंटेचें बटन दाबलें.

"जी हुजूर," करीत जरीच्या फितीनीं मढविलेला लांबलचक लाल अंगरखा घातलेला उस्मान जमादार आंत आला. त्याची ती उंच व जाड शरीरयष्टि, पांढऱ्या झालेल्या झुबकेदार मिशा आणि रुबाबदार चेहरा पाहतांच त्यालाच धरमगडचा दिवाण कां केलें नाहीं असा प्रश्न पाहणारांच्या मनांत येई. अगोदरचे दिवाण रावबहादुर दीडमिशे यांचेबरोबर तो दिल्लीस गेला असतां दोन तीन ठिकाणीं असा चमत्कार घडला कीं ते ज्या अधिकाऱ्याकडे भेटण्यास जात, तो धांवत येऊन

उस्मानशीच हस्तांदोलन करून "हाउ डू यू डू, दिवाणसाहेब ?" असें विचारी. तेव्हां दिवाणसाहेबांनीं त्याच्या गळ्यांत पट्टा अडकवून त्यावर " दिवाणांचा जमादार" अशी अक्षरें ठळक रीतीनें खोदविली.

काब्राजींनी त्याला विचारलें, "उस्मानमिया, ह्या खोलीत आज बाहेरचं कोणी आलं होतं का ?"

"जी नाहीं,हुजूर; मी कोणालाही आंत जाऊं देत नाहीं अन् मी नसलों तर ह्या खोलीला कुलूपच लावलेलं असतं . "

"किल्ली कोणाजवळ असते ?"

"एक किल्ली माझ्याजवळ अन् दुसरी प्रायव्हेट सेक्रेटरीसाहेबां-जवळ. "

साहेबांचं घड्याळ नाहींसं झालं आहे. काल ते इथं होतं अन् आज सांपडत नाहीं ! "

" घरांत सगळीकडे शोध केला तर सांपडेल. कदाचित् साहेबांनींच तें दुसरीकडे ठेवलं असेल, "उस्माननें सुचवलें.

दिवाणसाहेबांच्या उतावळ्या स्वभावानें पुनः उसळी मारली. "उस्मान, ते तुझ्याशिवाय इथून गेलेलं नाही. मि. काब्राजी, माझी खात्री आहे की, ह्यानंच तें घेतलं असलं पाहिजे. ब्रिटिश इंडियांतले शिपाई किती प्रामाणिक असतात !"

"इथलेही शिपाई प्रामाणिक असतात, सर. उस्मान इथं फार जुन्या काळापासून काम करतो आहे, पण त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल संशय घेण्याजोगं अद्याप कांहीच घडलं नाही, युवर एक्सलन्सी."–काब्राजी.

"ह्याला ॲरेस्ट करा अन् तो कबूल होईपर्यंत पोलिसच्या कोठडींतच अडकावून टाका." दिवाणसाहेबानीं फर्मावलें.

काब्राजीला उस्मानविषयी फार आदर वाटत असे. त्याच्या हातून चोरी होणें अशक्य आहे, असें त्यांनी दिवाणसाहेबांस परोपरीनें सांगितलें; पण त्यांचा हट्ट थांबेना. आपल्याला पोलिस चौकींत डाबवणार हें समजतांच उस्मानला एकदम रडूं कोसळलें. "या खुदा, इतकीं वर्षे मी अब्रूनं काढलीं अनू आठ दिवाण माझ्या हाताखालून गेले, पण एकानेंही माझ्या दानतीबद्दल शंका काढली नाहीं. मी ह्या मद्रासी दिवाणाचा बाप शोभेन इतका म्हातारा आहें आणि ह्यानं माझ्यावर अशी तोहमत आणावी ?" अशा प्रकारें तो बडबडूं लागला. त्याच्याबद्दल मनांत आदर असून त्यास अटकेंत ठेवण्याचा हुकूम करणें काब्राजीला भाग पडलें. त्याची ती भव्य पगडी, चांदीचा बिल्ला असगारा रेशमी पट्टा, तो मौल्यवान् लाल अंगरखा हे सर्व कपडे उतरून देणें त्याला भाग पडलें. त्याच्या दंडाला दोऱ्या बांधणाऱ्या शिपायांच्या देखील डोळ्यांना पाणी आलें; पण करतात काय ? सगळे पडले हुकमाचे ताबेदार ! काढण्या घालून त्याला गांवांतून मिरवीत पोलिस चौकींत कच्च्या कैदेंत ठेवण्यात आलें. त्याच्या मानी आणि इमानी कलिजावर दारुण आघात पडला. कधी एखादी टांचणी किंवा पेन्सिल देखील ज्या टेबलावरून आपण उचलली नाही त्या टेबलावरील सोन्याचें घड्याळ चोरण्याचा आळ आपल्यावर यावा याचें त्याला फार दुःख झालें. घरीं त्याच्या बायकोचाही शोक अनावर होता. चोरीच्या आरोपावरून आपल्या बापास कैद करण्यांत आलेलें पाहून त्याच्या मुलांमुलींनाही फार वाईट वाटलें. मुलगे बिचारे चौकीवरील पोलिसाकडे जाऊन "आमच्या बापाला मारहाण करूं नका," असें सांगत असत. उस्मान-विषयीं सर्वच गांवकऱ्यांच्या मनांत प्रेम असल्यानें त्याला कबुलीजबाबासाठीं मारझोड करण्यांत आली नाहीं. तरीही सर्व हयात

मानानें व अब्रूनें काढल्यावर असा प्रसंग यावा ह्या खंतीनें उस्मानची प्रकृति एकदम खालावली. तो वेड्यासारखा बरळूंही लागला.

आणखी तीनचार दिवस लोटले. तो जवळ जवळ वेडाच बनला होता. हें पांघरलेलें वेड असावें असा समज दिवाणसाहेबांनी करून घेतला. सकाळी नऊच्या सुमारास काब्राजी राज्याच्या बंदोबस्ताच्या गोष्टी दिवाणसाहेबांना सांगत असतां म्हणाला, "जातां जातां एक खेदाची गोष्ट सांगायची राहिली, युवर एक्सलन्सी. आपला जमादार उस्मान ह्यानं काल रात्री गळयाला फांस लावून जीव दिला."

" म्हणजे, तो घड्याळचोरच ना ? "—दिवाणसाहेब.

" मी नाही समजत त्याला घड्याळचोर ! घड्याळ चोरल्याचा संशय ज्याच्यावर आला होता तो, असंच मी म्हणेन." काब्राजी जरा चिडून बोलला.

" कॅप्टन रघुबीरसिहजी भेटण्यास आले आहेत" अशी वर्दी सेक्रेटरीनें दिल्यावर "त्यांना पाठवून द्या" असें दिवाणसाहेबांनी उत्तर दिलें.

"आतांच मुंबईहून परत आलों. राणीसाहेबाकरतां रेऑनचीं दोन पातळं खरेदी केलीं. आपल्या अन् किसनगडच्या मध्यें जो दावा चालू आहे, त्याचे कागदपत्र सॉलिसिटरकडे सोंपून दिले. हो, इंग्लिश मॅस्टिफची (कुत्र्याची) पिलं राजकुमारीकरतां खरेदी केली. फार दिवस त्यांचा नाद चालला होता अन् (खिशांत हात घालून) आपलं नेक नामदारांचं सोन्याचं घड्याळही नवी स्प्रिंग बसवून आणलं. चांगलं चालतं आहे आतां." असें म्हणून रघुबीरनें लेडी कृष्णस्वामींचें घड्याळ खिशांतून बाहेर काढून दिवाणसाहेबांपुढें ठेविलें.

कारभाजी चकित होऊन त्या घड्याळाकडे पाहत राहिले. त्यांच्या पोलिशी डोळयांतून देखील अश्रुबिंदु बाहेर पडले.

स्वतःच्या उतावळ्या स्वभावाबद्दल पश्चात्ताप पावलेले दिवाणसाहेब फडाफड स्वतःच्या तोंडांत मारून घेऊं लागले.

मध्यंतरी घडलेल्या घटनेचें अज्ञान असलेले रघुबीरसिंहजी बुचकळ्यांत पडून आळीपाळीनें दोघांच्या चेहऱ्यांकडे पाहत राहिले.

## बायकांचा विपरीत स्वभाव : : १४

बडोद्याहून सुरतेस जाण्याकरितां मी एक्सप्रेसच्या डब्यांत शिरलों. मी ज्या बाकावर बसलों त्यावर माझा खूप जुना मित्र जुन्नरकर सहकुटुंब बसलेला होता. मी डब्यांत शिरतांच, “ ओ हो हो हो अलभ्य लाभ! जोशी, आज वीस वर्षांनी आपली भेट होत आहे, ” असें म्हणून त्यानें मला आपल्या जवळ बसविलें. त्याच्या बायकोनेंही मला ओळखलें व आम्ही एकमेकांस नमस्कार केला. प्राथमिक चौकशा चालू झाल्या. जुन्नरकर दांपत्य मुलीला अमदाबादेस नवऱ्याकडे पोंचवून परत पुण्यास चाललें होतें.

गाडी चालू झालेली होती. आमच्या गप्पागोष्टी चालत होत्या, पण सौ. जुन्नरकर कांहींच बोलत ना. “वहिनी, तुम्ही कां नाहीं बोलत कांहीं ? डोकं दुखतं आहे का ?” मीं विचारलें.

“ अरे, कसलं आलं आहे डोकं ?” मुलीला सोडून एकटी परत चालली आहे ना म्हणून तिला वाईट वाटत आहे. बायकांची जात वेडी असते.”– जुन्नरकर.

सौ. जुन्नरकरनी मानेला हिसडा दिला आणि म्हटलें, "ह्यांत वेडेपणा काय आहे ? आमचा इतका सहवास, अठरा वर्षांत क्षणभर एकमेकींना सोडून राहिलों नाही. पांच मिनिटं उशीर झाला मला आंग धुऊन बाहेर यायला तरी पोरगी रडकुंडीला यायची. मग आतां तीन तीन महिन्यांत भेट व्हायची नाहीं. मग कोणालाही वाईट वाटल्याशिवाय का राहणार आहे ? "—डोळ्यांतून टिपकण्याच्या बेतांत असलेले अश्रू त्यांनी पदरानें पुसून टाकिले.

"पण तूंच ना सारखी मागें लागली होतीस मुलीचं लग्न लौकर करून टाका म्हणून ! आणखी दोन वर्षे आपण थांबलों असतों तर आजच लाडक्या लेकीचा वियोग सहन करावा लागला असता का तुला ? पोरीच्या लग्नाच्या आधीं, लग्न जमत नाही म्हणून रडायचं अन् लग्न झालं म्हणजे पोरीची न् माझी ताटातूट झाली म्हणून रडायचं, असा बायकांचा मोठा विपरीत दुटप्पी स्वभाव असतो नाहीं का रे ? " जुन्नरकरानें माझी संमति मागत म्हटलें.

"बरोबर आहे, परवां असंच झालं. एका मुलीला तिचा नवरा बाळगीत नाहीं म्हणून आईबाप सारखे आक्रोश करीत होते. पुढें स्नेह्यांच्या मध्यस्तीनं पोरीचा नवरा आला आणखी तिला घेऊन जाऊं लागला. तेव्हां तर 'माझ्या बगडे ! आतां पुनः केव्हां भेटशील ग ?' असा हलकल्लोळ त्यांनीं मांडला. पण ह्या आक्रोशांत नवरा-बायको दोघं सामील होतीं. बायकोप्रमाणेंच नवऱ्यानंही दुटप्पी स्वभावाचा मासला दाखविला."

त्या माझ्या उत्तरानें सौ. जुन्नरकर खूष झाल्या. थरमॉस उघडून त्यांनी नवऱ्याला आणि मला दोघांना थोडा थोडा चहा दिला.

" बरं तें जाऊं देरे. वीस वर्षांपूर्वी आपली भेट पुण्यास झाली

होती. छोकरा होता तुझा चारपांच वर्षांचा तुझ्याबरोबर. तो आतां ग्रॅज्युएट झाला असेल नाही ? " मी विचारलें.

छोकऱ्याची आठवण जुन्नरकराला फारशी आवडलेली दिसली नाही. पण आमच्या वहिनींनी सांगितलें कीं, चंदू बी.एस्सी. झाला आहे माइनिंग घेऊन आणि बंगालमध्यें कुठल्याशा खाणीवर एंजिनियरचें काम करतो.

"लग्न झालंच असेल त्याचं ! कारण पंचवीस सव्वीस वर्षांचा तो असणार."—मी.

"त्याचं लग्न होऊन दोनतीन वर्षं झालीं. हौसेनं आणखी माझ्या आईच्या डोळ्यादेखत व्हावं म्हणून हल्लीच्या दृष्टीनं जरा लौकरच केलं. पण लौकरच केलं तें चांगलं झालं नाही असा मला अनुभव आला." जुन्नरकर म्हणाला.

"कां बरं ? मुलगी मनाजोगी मिळाली नाही वाटतं ! "—मी.

सुस्कारा टाकून त्यानें सांगितलें, "मुलगी चागली नक्षत्रासारखी मिळाली रे. पण सासरा नाही चांगला मिळाला त्याला."

"कां बरं ! हुंडा वाटतं नाहीं मिळाला मनाजोगता ?"

"हुंडा भरपूर मिळाला अन् तिथच बिघडलं. दोन हजार रुपये घेऊन मीं आपला मुलगा त्या चिटणिसाला विकत दिला असं म्हणेनास.! " जुन्नरकर आवेशानें खिडकीच्या चौकटीवर हात आपटून म्हणाला.

"इश्श बाई ! नेहमी नेहमीं हेंच काय म्हणत असतां ? तो आपला मुलगा अन् त्यांचा जांवई आहे."—सौ. जुन्नरकर.

"बस्. तुला काय होतं आहे उठल्या सुटल्या त्या चिटणिसांची कड घ्यायला? माझ्या मनांतून तो एल्एल्. बी. व्हावा अन् माझ्या बरोबरीनं घरीं राहूनच त्यानं वकिली करावी असं होत; पण त्या चिट-

णिसांनी नादी लावल त्याला माइनिंग एंजिनियर व्हायला. बापाचा मार्ग नाहीं पसंत पडला गाढवाला ! अन् सासऱ्याच्या आहारीं गेला. ते चिटणीस पाटण्यास राहतात. आपली मुलगी बिहारमध्यें आपल्याजवळ असावी अस त्यांना वाटल."—

"इकडे नव्हतं का वाटत आपला मुलगा आपल्याजवळ असावा ? तसंच त्यांना वाटल आपल्या मुलीबद्दल !"—सौ. जुन्नरकर.

बायकोनें अशा प्रकारें आपली अडवणूक करावी हें त्याला आवडलें नाहीं. तो म्हणाला, " तूं आतां मधी बोलूं नको. व्याह्यांच्या श्रीमंतीनं तुझे डोळे दिपलेले आहेत. पण खरं सांगतों, जोशी, सून करायची तर गरीबाची मुलगीच करावी. बापापेक्षां सासरा श्रीमंत मिळाला म्हणून बाळ्या माझं कांहीच ऐकेनासा झाला आहे. आजारी पडला, दोन महिन्यांची रजा घेतली तेव्हां तरी पुण्याला स्वतःच्या घरीं विश्रांतीला नको होतं का यायला ? पण मूर्ख बेटा पाटण्याला सासऱ्याच्या घरीं जाऊन लाचारासारखा राहिला होता ! कोडगा लोचट माणूस.! "

म्हटलच आहे, "असारे खलु संसारे सारं श्वशुरमंदिरम्"—सुभाषिताचा चरण मी ठोकून दिला.

"अलीकडच्या कार्ट्यांना आईबाप नकोसे झाले आहेत. सासूसासरेच त्यांना देवतांप्रमाणें वाटत असतात. उलट पोरींना सास्वा नकोशा झाल्या आहेत. त्या तान्ह्या बाळाप्रमाणें आईलाच चिकटून असतात. अशी उलटी दुनिया झाली आहे आजकाल जोशीबुवा ! उघडतील डोळे बाळ्याचे एखाद्या मेहुण्यानं श्वशुरमंदिरांतून गचांडी दिल्यानंतर." जुन्नरकरांचा पारा अगदीं वरच्या टोंकाला पोंचलेला होता तो खालीं आणण्याच्या उद्देशानें मीं म्हटलें, " जाऊं दे रे, जुन्नरकर, तरुण पोरांचं काय मनावर घ्यायचं आहे ! आजकाल सगळेच तरुण या पुरोगामी

विचारांनी अन् नवमतवादानं बहकलेले आहेत. शांत डोकं ठेवून वडील माणसांच्या विचारानं चालणारा तरुण औषधालासुद्धां सांपडायचा नाही."

माझें म्हणणें त्याला पटलें नाही. तेव्हा संमतीच्या अपेक्षेनें मीं त्याच्या बायकोकडे पाहिलें. ती तोंडाला पदर लावून हांसत होती.

"मग काय, आहे एखादा हरीचा लाल असा?" मी विचारिलें.

"हांस तू खुशाल दात काढून." जुन्नरकर बायकोला म्हणाले, "पण खात्रीनं सागतों आपले बाबूराव अशा प्रकारचे आदर्श तरुण आहेत. किती सालस, किती प्रेमळ अन् आज्ञाधारक! टोपी घातल्याशिवाय ते हिंडूं लागले, तेव्हा मी त्यांना म्हटलं, "बाबूरांव, आपल्या समाजांत बोडक्यानं हिंडणं अशुभ समजतात." तेव्हांपासून ते टोपी घातल्याशिवाय कधीही फिरत नाहीत." जुन्नरकर बोलूं लागले.

बाबूराव हे आपले जामात असतील, असा तर्क मी प्रदर्शित केला.

"हो! आमचे जामातच ते! आमची ताई त्यांना दिलेली आहे. ताई तर फारच प्रेमळ आहे हो. लग्न होऊन एक बाळंतपणहि झालं तरी आईबापांचा फारच जिव्हाळा तिला. गावांतल्या गांवांतच दिली आहे म्हणून बरं आहे. दिवसांतून दोन वेळां तरी माहेरी आल्याशिवाय रहावत नाहीं तिला. नाही तर अलीकडच्या बेफाट पोरी. लग्न झालं कीं आईबाप जसे कोणी नाहीतच आपले! बाबूराव पण आम्हांला फार चिकटून असतात. मी सांगेन तसं शहाणपणानं वागतात. बाप सांगत होता, कष्टम् खात्यांत नोकरी धर म्हणून. मी म्हटलं 'बाबूराव, ताबेदारी कशाला करतां दुसऱ्याची? छानदारसं कापडाचं दुकान थाटा अन् स्वतंत्रपणानं रहा. कष्टम् खात्याची नोकरी 'अहो कष्टम्' म्हणायला लावते."

" मग त्यांनी तुमचंच ऐकलं वाटतं ? "--मी

" हो तर ! शहाणेच आहेत ते ! आपल्या हिताचं काय आहे-तें त्यांना बरोबर समजतं. अमक्या कंपनीचे शेअर घ्या किंवा तमक्या घोड्यावर पैसे लावा वगैरे सगळ्या बाबतीत माझ्या ओंजळीनं ते पाणी पितात अन् म्हणूनच मी म्हणूं शकतों कीं सगळ्याच तरुणांची डोकीं पुरोगामी विचारांनी फिरून गेलेली आहेत असं नाही. बाबूरावासारखा एखादा तरी वडील माणसाचं ऐकणारा त्यांत सांपडतो. "

अशा प्रकारचा आज्ञाधारक आणि गरीब जांवई आणि अशा प्रकारची प्रेमळ मुलगी लाभल्याबद्दल जुन्नरकरद्वयांचें मी अभिनंदन केलें. इतक्यांत सुरतचें स्टेशन आलें, आणि मी त्यांस नमस्कार करून त्यांची रजा घेतली. माझ्या नमस्काराचा स्वीकार करीत सौ. जुन्नरकर म्हणाल्या, " जोशी भावजी, आतां कळालं का कोणाचा स्वभाव विपरीत असतो तें, बायकांचा का पुरुषांचा ? "

" वहिनी, तें कांहीं बायका न् पुरुष याच्यावर अवलंबून नाहीं. ' अहं ' ह्या व्यक्तीला जगाचा मध्यबिंदु कल्पून त्या धोरणानं इतर व्यक्तींच्या वर्तनाची परीक्षा करणारांना जग फिरत आहे न् आपण मात्र स्थिर आहों असं वाटत असतं. बरं आहे पुनः भेटूं असेच कधींतरी तेव्हां हा चांगलेवाईटपणा बदलेल अशी आशा आहे." इतकें बोलून मी माझें सामान उतरण्याच्या कामाला लागलों.

# टोळ आणि मुंगी : : १५

### युद्धपूर्व कथा

-१-

उन्हाळ्याचे दिवस होते. हजारों-लाखों मुंग्या तांदुळाचा एकेक कण तोंडांत धरून धान्याच्या कोठारांतून आपल्या वारुळाकडे नेत होत्या. धान्याच्या पोत्यापासून वारुळापर्यंतचा प्रवास कांहीं सामान्य नव्हता. वाटेंत एक मोरी होती. मधूनच तिच्यांतून पाण्याचा लोंढा येऊन रांगेंतल्या शेंपन्नास मुंग्या वाहून जात. केव्हां केव्हां द्वाड पोरें येऊन मुंग्यांच्या रांगेवर पाय देऊन शेंकडों जिवांचा चुराडा करीत. कधीं कधीं मोलकरीण लीलेनें केरसुणी घेऊन सगळ्या पलटणीची वाताहात लावी; परंतु न घाबरतां, जीवाची पर्वा न करतां, तांदुळाचे दाणे वारुळांत सांठवून पुढल्या पिढीची बेगमी करण्याचें सामुदायिक कर्तव्य ते प्राणी निष्ठेनें, नेटानें, धैर्यानें पार पाडीत होते.

कांहीं टोळ उन्हाळ्यांत टोळभैरवपणा करून मजेंत आयुष्य घालवीत होते. फुलांतील रस चाखावा, इकडे तिकडे पडलेले दाणे

वेंचून खावें आणि गाणें म्हणत रानभर फिरावें, असा त्यांचा क्रम होता. पावसाळ्याची बेगमी करावी असें त्यांच्यापैकीं एखाद्याच्या स्वप्नांतही आलें नाही.

त्यांपैकी एक टोळ एका मुंगीला म्हणाला, "ताई, तूं कशाला एवढे कष्ट घेतेस? पवित्रशास्त्रांत देखील म्हटलं आहे, 'उद्याची काळजी कशाला बाळगतोस? कां की आजचींच संकटं आजला पुरेशी आहेत.' चल माझ्याबरोबर. आपण नूतन रेस्टोरांत जाऊन साखर खाऊं, चित्रपटगृहांत जाऊन पडद्यावरून भटकणाऱ्या पाली पाहू, नाही तर फूलबागेंत जाऊन फुलांचा फन्ना उडवूं."

मुंगी म्हणाली, "भाई, सुगीचे दिवस अशा तऱ्हेनं हिंडण्याबागडण्यांत घालवलेस तर पावसाळा तुला जड जाईल. त्यापेक्षां आतां मेहनत करून पावसाळ्याचं धान्य सांठव, सरपण सांठव, चिंध्या गोळा कर. एकदां का पाऊस सुरू झाला म्हणजे दाणा दृष्टीस पडणार नाही, कोरडं सरपण मिळणार नाही अन् चांगली चिंधी तुला सांपडणार नाहीं."

टोळ म्हणाला, "उद्याचं संकट आजला ओढून घेणारा मूर्ख मी नाहीं. खुशाल तूं सांठा कर. मी आपला मजा उडवण्यांत उन्हाळा घालवणार."

उन्हाळा संपून पावसाळा लागला. धान्याचा एक कणही इकडे तिकडे पडलेला टोळाला सांपडेना. गवताची कोरडी काडी देखील पेटवण घालायला मिळेना. थंडीपासून बचाव करण्यासाठीं कोरडी चिंधी कोठें सांपडेना. टोळांचें गाणेंबजावणें बंद पडलें. उपाशीं थंडीनें काकडणारे टोळ मुंग्यांच्या वारूळाशीं जाऊन भीक मागूं लागले. भाई टोळ ताई मुंगीच्या दाराशीं जाऊन तांदुळाचे दोन दाणे मागूं लागला.

"तरी मी तुला सांगत होत्यें, भाई–" मुंगी.

" सगळं कबूल आहे, ताई, पण मीं सगळा उन्हाळा गाण्या-बजावण्यांत खर्च केला–" टोळ.

" उन्हाळा गाण्याबजावण्यांत घालवलास तसा पावसाळा नाचण्यांत घालीव म्हणजे झालं ! मीं जो सांठा केला आहे तो टोळांच्या करतां नसून मुंग्यांच्या भावी पिढीकरतां केला आहे. जा आतां इथून." मुंगी टोळास हाकून देत म्हणाली.

टोळ बिचारा भुकेनें कासावीस होऊन मरून गेला.

तात्पर्य—भविष्यकाळीं दुर्मिळ होणार असलेल्या वस्तूंचा आजच संचय करणें हा शहाणपणा आहे. संचय करणारा कधींहि उपाशी मरणार नाही.

## युद्धोत्तर आवृत्ति.

### २

दोन प्राणी मुंग्यांचीं वारुळें तपाशीत फिरत होते. त्यांपैकीं एक टोळ आणि दुसरा त्याच्या हाताखालचा नाकतोडा होता. एका वारु-ळाशीं जाऊन तो ओरडला, " मुंगी साठे येथेंच राहतात ना ? "

" होय, आईला बोलावूं का ? " नुकतीच अंड्यांतून बाहेर पडलेली लहानशी मुंगी विचारती झाली.

" बोलाव. " तंगड्या फांकून विडी शिलगावीत टोळ म्हणाला.

लहान मुंगीनें आईला बोलावून वारुळाच्या दाराशीं आणलें. हीच ती मुंगी साठे. अठरा हात लांबीचें लाल लुगडें नेसून आणि मनगटा-पर्यंत पोंचणाऱ्या बाह्यांचें पोलकें घालून ती बाहेर आली होती.

तिला पाहून टोळानें विचारलें, " मुंगी साठे आपणच नव्हे का ? या कापड-वांटणीच्या दिवसांत इतकं लांब लुगडं नेसायला अन्

इतकं मोठं पोलकं आपल्याला घालायला मिळतं हें मोठं आश्चर्य आहे ! तें असो; अरे नाकतोडे, काढ तो कागद बाहेर."

नाकतोड्यानें पिशवीतून काढून दिलेला कागद वाचीत टोळ म्हणाला, " बाई, तुमच्यावर साठेबाजीचा आरोप आहे ; तुम्हीं तीन वर्षं पुरेल इतकं कापड, राकेल, साखर, अन् धान्य वारुळांत सांठवून ठेवलं आहे असा तुमच्यावर आरोप आहे. सरकारी कायदा मोडून हा साठेबाजीचा गुन्हा केल्याबद्दल तुम्हांला तुरुंगांत जायची पाळी येईल. "

" हें सगळ सांगणारे टोळभैरव आपण कोण ? सांठा करणं हा तर आम्हां मुंग्यांचा जन्मसिद्ध स्वभाव आहे. उद्योगानं मिळवावं अन् जतन करून भोगावं हें आमचं धोरण पूर्वापार आहे—" मुंगी.

" मी रेशनिंग इन्स्पेक्टर आहें. शिवाय मी जातीचा टोळ आहें; निरुद्योगानं मिळवावं हाच आमचा बाणा. तुमच्या सगळ्या सांठ्यावर जप्ती घेऊन आलों आहें मी. चला रे नाकतोडे, काढ बाहेर त्यांचा सांठा—" अंमलदार टोळ अधिकारवाणीनें म्हणाला.

मुंगी बिचारी घाबरली. तिचें आणि टोळांचें संभाषण झालें तें सगळें येथें देण्यांत अर्थ नाहीं. आपल्या सांठ्यांतला अर्धा भाग इन्स्पेक्टरांच्या त्या जोडीला देऊन तिनें जप्ती चुकविली. "मुली, ह्यापुढें वाईट दिवसां-करितां बेगमी करणें हा गुन्हा आहे म्हणून तूं आपल्या आईजाद्यांचं अनुकरण न करतां खुशाल आळसांत दिवस घालीव." असें ती आपल्या मुलीला म्हणाली.

इकडे टोळही आपल्याला आतां चांगले दिवस आले ह्या आनंदांत गर्क होऊन फुकट मिळालेला डल्ला स्वतःच्या घरीं घेऊन गेला.

तात्पर्य—पुढें दुर्मिळ होणार असलेल्या वस्तूंचा आजच संचय करणें हा गुन्हा आहे. त्यापेक्षां आयत्या वेळीं कुठेंही डल्ला मारलेला काय वाईट ?

## सारंगीवाला : : : १६

मी जेवणखाण उरकून कांहीं तरी वाचीत खिडकीशीं बसलों असतां रस्त्यांतून दूर अंतरावरून येणारा सारंगीचा मंजुळ सूर माझ्या कानीं पडला. तो सुर हळूहळू माझ्या घराच्या जवळ जवळ येत होता. त्या काळीं 'राधेकृष्ण बोल' हें पद ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें होतें व त्यांचेच आलाप सारंगीवाला आपल्या वाद्यांतून काढीत होता. मीं त्याला हांक मारिली.

"जी महाराज, दोन पदं ऐकून गरिबाच्या पोटाला द्या कांहीं तरी" तो दीन वाणीनें म्हणाला.

मीं त्याला घरांत बोलाविल्यावर तो आंत येऊन जमिनीवर बसला. पाठंगुळी बांधलेल्या झोळींतून आणविलेल्या मुलीस त्यानें शेजारीं बसविलें आणि तारा छेडण्यास प्रारंभ केला. फारच गोड वाजविणें होतें त्याचें.

'राधेकृष्ण' झाल्यावर माझ्या मुलीनें विचारलें, "तुला एखादं मराठी पद येतें कीं नाहीं रे बाजवायला?"

"हो हो. पुष्कळ येतात. 'घेई विहंगसम भरारी' वाजवतों, ऐका," असें म्हणून त्यानें तें पद वाजवून दाखविलें. नंतर माझ्या मुलाच्या

सांगण्यावरून ‘ कशाला उद्यांची बात ’ वाजविली. ती पूर्ण होण्याच्या आंतच त्याची मुलगी रडूं लागली. माझ्या मुलीनें तिला खाऊ दिला, पण ती राहीना. तिची पाठ कुरवाळीत सारंगीवाला म्हणाला, “बच्चा, रडूं नको; बाईसाहेब तुला आंगडं देत्याल. थंडी लई वाजती माझ्या बाईला.”

माझ्या मुलांच्या आईनें ही सूचना ऐकून एक लोकरीचें आंगडें त्या पोरीला दिलें. आमच्या मनांत आणखी कांहीं पदें ऐकावयाची होतीं, पण ती पोरगी रडायची थांबेना; शेवटीं सारंगीवाल्याला आठ आणे देऊन ‘पुनः उद्यां ये’ असें सांगून त्याची पाठवणी केली.

दुसऱ्या दिवशीं तो आला नाही. दोनतीन दिवसांनीं पुनः आला. घरांतील प्रत्येकाच्या आवडीचीं दोन-चार पदें त्यानें वाजविलीं आणि मागल्या वेळेप्रमाणेंच त्याच्या मुलीनें भोकाड पसरलें. तिची पाठ कुरवाळीत तो म्हणाला, “ बच्चा, रडूं नको; बाईसाहेब तुला चाकुलेट देत्याल.” तिला चाकोलेट मिळालें व ती जराशी थांबली.

मीं म्हटलें, “ सारंगीवाला, ही मुलगी अशी रडते तर तिला बरोबर घेऊन कशाला हिंडतोस ? तिला आईजवळ ठेवून यावं की नाहीं ?”

खांद्यावरच्या फडक्यानें डोळे पुशीत तो म्हणाला, “ धनीसाहेब, त्या पोरीला आई न्हाई.”

“मेली कीं काय ?” बाईसाहेबांनीं विचारलें.

“मेली असती तरी बेश झालं असतं.” पुनः डोळे पुशीत तो म्हणाला,“ पण लाजिवरवाणी गोष्ट सांगायचं माझ्या कपाळीं आलं आहे. ही पोरगी सहा महिन्यांची होती. आम्ही दोघं पोरीला घेऊन रस्त्यानं भीक मागायची, मी वाजवायचा अन् ती गायची. एक दिवस एका मोटरवाल्या शेठजीनं तिचं गाणं ऐकलं. ‘चल सिनेमांत काम करायला माझ्यासंगं, शंभर रुपये पगार देतों’ असं त्यानं म्हटलं. मला

अन् या पोरीला मात्र त्यांनीं घालवून दिलं. तेव्हांपासून पोरीला घेऊन रस्तोरस्तीं फिरतों आहें. ठेवूं तरी तिला कोणाजवळ ? गरिबाला सगेवाले नसत्यात."

त्याची हकीगत ऐकून आमचीं हृदयें कळवळलीं. बिचाऱ्याची बायको त्याला सोडून गेली. लहान पोरीला घेऊन वणवण हिंडतो आहे. स्वतःच्या हृदयांत पेटलेला आगीचा डोंब दडपून ठेवून पोटांकरितां सारंगींतून मंजुळ स्वर काढून पैसेवाल्याचें मनोरंजन करण्याची वेळ त्याच्यावर यावी याबद्दल मला फार वाईट वाटलें. त्याच्या संसाराची होळी झाली आहे, त्याला 'दिवाळी आली' हें पद वाजवायला सांगणाऱ्या भांडवलवाल्या अन्नदात्यांचा मला त्वेष आला. स्वतःचीं दुःखें मनांतल्या मनांत दाबून टाकून अगोदरच सुखासीन असलेल्या खुशालचेंडूंची खुशामत करणाऱ्या कलावंतांच्या दुर्भाग्याची सहानुभूति मला वाटूं लागली. ह्या होरपळलेल्या जीवांकडून आपलें मनोरंजन करून घेणें हा एक अक्षम्य गुन्हा होईल असें वाटून त्याला मीं म्हटलें, "बरं आहे. आतां वाजवणं पुरे कर. मुलगी कंटाळली असेल." एक रुपया त्याच्या हातावर ठेवून त्याला मीं रजा दिली.

रुपया कनवटीला लावून, " चल बेटा, तुझ्या दुधाला रुपया होईल. " असें म्हणून त्यानें त्या मुलीला पाठंगुळीस लटकावलें व आम्हां सर्वांना रामराम करून तो निघून गेला.

रात्रभर त्या अभागी सारंगीवाल्याबद्दलचे विचार माझ्या मनांत घोळत होते. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मी फिरावयास गेलों असतां एकदम अचानकपणें पावसाची सर आली. जवळच असलेल्या धर्मशाळेच्या वळचणीखालीं आसऱ्याकरितां मी उभा राहिलों. एका परदेशी बाईनें तीन दगडांची चूल पेटवून तिच्यावर तवा ठेविला होता. लाकडें

धगधगीत पेटल्यामुळें तिचा मोहक चेहरा स्पष्ट दिसत होता. बाहेरून एक मनुष्य अर्धवट भिजलेला धांवतच आला. पाठंगुळीचें गांठोडें त्या बाईजवळ देऊन तो म्हणाला, "सांभाळ बेबीला, भिजली आहे पाण्यांत, जरा शेक दे." त्या गांठोडयांत त्याची बेबी होती.

नंतर त्यानें बगलेंतील सारंगी खुंटीला लाविली आणि आपणही शेकत बसला. जळत्या लाकडांच्या उजेडांत त्याचा चेहरा स्पष्टपणें मला दिसला. कालचाच सारंगीवाला होता तो !

"धनी, कशाला बेबीला रोज रोज पाण्यांत अन् थंडींत घेऊन जात असतां ! किती काकडली आहे बिचारी पाहा !" बेबीची आई म्हणाली.



# आमचीं प्रकाशित पुस्तकें

**श्री. वि. स. खांडेकर**

| | |
|---|---|
| नवा प्रातःकाल (दु. आ.) | २॥ |
| पूजन (दु. आ.) | ३ |
| पहिल्या वाहिल्या | २। |
| गोफ आणि गोफण | ३ |

**श्री. वि. वि. बोकील**

('वसंताच्या लीला')

| | |
|---|---|
| बेबीचा भाऊ (दु. आ.) | ३ |
| चिमखडे | २॥ |
| साडेतीन शहाणे | ३ |
| वसंत | ३ |
| भाऊ-भाऊ | २॥ |

**श्री. द. र. कवठेकर**

| | |
|---|---|
| नादनिनाद | १॥ |
| चांदण्यांतील सावल्या | ३ |
| शालन | ३ |
| मंदा | २ |

**श्री. ना. धों. ताम्हनकर**

| | |
|---|---|
| आमचे हे | ३ |
| मामा (दु. आ.) | २ |
| विद्यामंदिरांत | ०॥। |

**श्री. अनंत काणेकर**

| | |
|---|---|
| घरकुल | १। |
| काळी मेहुणी | १॥। |

**श्री. ना. ह. आपटे**

| | |
|---|---|
| मी वाट पाहीन | २। |
| एकटी | ५ |

**श्री. चिं. वि. जोशी**

| | |
|---|---|
| संचार | २॥ |
| ओसाडवाडीचे देव | २ |
| सोळा आणे | २॥ |

**श्री. गोपीनाथ तळवलकर**

| | |
|---|---|
| अनुराधा | २ |
| आशियाचे धर्मदीप | २ |

**श्री. र. गो. सरदेसाई**

| | |
|---|---|
| स्वाति | १॥ |

**श्री. 'धनंजय'**

| | |
|---|---|
| कलावंतांच्या सहवासांत | ३ |

**श्री. सौ. शांता नाशिककर**

| | |
|---|---|
| नीलेचा दिलरुबा | २ |

**श्री. चिरडे**

| | |
|---|---|
| भंगलेली मूर्ति | २ |

**श्री. दत्त उद्धव वैद्य**

| | |
|---|---|
| मोगरीचा गजरा | १॥ |

**श्री. प्रभाकर पाध्ये**

| | |
|---|---|
| प्रकाशांतील व्यक्ति | १॥। |

**श्री. गं. त्र्यं. माडखोलकर**

| | |
|---|---|
| जीवन-साहित्य | २॥ |

**काकासाहेब कालेलकर**

| | |
|---|---|
| जीवन आणि समाज | १॥। |